# मी–रामजोशी



प्रकरण पहिलें

## मी वेदाभ्यासी बनलों

आयुष्याचं सिंहावलोकन करण्यांत केव्हां केव्हां जितकी गंमत वाटते, तितकंच दुःखही होतं. त्या सिंहावलोकनाची जेव्हां बखर करायची असते तेव्हां पुनःप्रत्ययाचा आनंद व्हायच्या ऐवजीं जुन्या आठवणीकडे द्रष्टा या नात्यानं पहातांना स्वतःच्या आयुष्याशीं एक प्रकारचा परकेपणा उत्पन्न होतो. माझ्या आयुष्यांतील प्रसंगांची ही बखर करतांना मलाही अशीच परकेपणाची नजर ठेवावी लागली आहे.

तसं पाहिलं तर सारा जन्मभर सर्वांनाच मी परका होतों—माझा मलासुद्धां परका होतों. प्रवाहप्रतिताप्रमाणें मी ही कामगिरी पतकरली त्याच वेळीं मी स्वतःशीं परका झालों.

बी. ए. होतांच सहज मी या निमगांवला आलों—अगदीं नकळत कॉंग्रेसचा प्रचारक म्हणून आलों. इथल्या पांडुअण्णा, घोंडशेट प्रभृति मित्रांची आणि बाबीकाका प्रभृति

विरोधकांची माझ्याशीं जी गांठ पडली, या मैत्रीला आणि विरोधाला तोंड देण्याच्या कामीं बाबीकाकांची मुलगी किकी आणि एका कुळवाड्याची मुलगी जनी यांनीं माझ्याशीं जें महत्कार्य केलं, त्यांतूनच निमगांवच्या भवितव्यांत बदल करण्याचं महत्कार्य माझ्या हातून सहज पार पडलं—माझी ताकद नसतांनासुद्धां या महत्कार्याचं श्रेय माझ्या वांट्याला आलं.

इंग्रजी शाळेचा मास्तर म्हणून मी इथल्या कामगिरीला सुरवात केली आणि त्याबरोबरच, गांवचं अन्नवस्त्र गांवच्या लोकांनींच निर्माण करावं, हें तत्त्व अमलांत आणण्यासाठीं खादीची चळवळ सुरू करून केवढ्या तरी मोठ्या प्रमाणांत खादीची निपज करण्याचं काम मला यशस्वी करतां आलं. म्हणूनच या जुन्या प्रसंगांचं सिंहावलोकन करतांना मला समाधानाचं सौख्य अनुभवीत ही बखर लिहिणं सुखाचं झालं आहे.

झगड्याच्या प्रसंगाची आठवण आली, कीं आतां एक प्रकारें दुःख वाटतं. त्यावेळीं वृत्ति तशी नव्हती. ईर्षेची आग पेटल्यामुळं बेभान होऊन मी कार्याला लागलों होतों. त्या कार्यांत जिथं तिथं झगडा देतांना मनाचा उत्साह अनावर होऊन त्याचं रूपांतर आवेशांत झालं होतं. या आवेशाची पेटती आग विझवायला मित्रांनीं आणि शत्रूंनीं मला सारखीच मदत केली.

ही जी मैत्री होती ती वैयक्तिक नव्हती. शत्रुत्व होतं तेंही तसंच होतं. म्हणूनच शत्रु-मित्रत्वाच्या त्या भावनेला आत्यंतिक स्वरूप केव्हांच आलं नाहीं आणि म्हणूनच हातीं घेतलेलं काम यशस्वी करण्यांत मला अनपेक्षित विजय मिळाला.

निमगांवांतला रस्ता झाल्यापासून गांवच्या लोकांची माझ्याबद्दलची श्रद्धा वाढूं लागली होती. सारे मला 'गुरुजी' म्हणत. पण तसं म्हणून घ्यायचा अधिकार मला कुठं होता ? धोंडशेटसारखीं अधिकारी माणसंसुद्धां ज्यावेळीं मला 'गुरुजी' म्हणून मान देत त्यावेळीं माझी मलाच लाज वाटे. हीं सारीं माणसं फारशीं सुशिक्षित नव्हतीं—म्हणजे त्यांना इंग्रजी येत नव्हतं—मला इंग्रजी येत होतं, इंग्रजी भाषेचा अभ्यास करून मी पदवीधर झालों होतों, तेवढ्याच एका अपघातासाठीं हे मला 'गुरुजी' म्हणून मान देत होते. तसं पाहिलं तर धोंडशेट हे माझ्यापेक्षां कितीतरी विद्वान होते. आर्यसमाजाचे अनुयायी असल्यामुळं वेदांचा आणि उपनिषदांचा त्यांनीं चांगलाच अभ्यास केला होता. या ग्रंथांची मला पुरती ओळख-सुद्धां नव्हती. खोट्या अभिमानाला बळी पडून अज्ञानांत वावरूं नये म्हणून मी धोंडशेटच्या नजरेखालीं वेदांचा अभ्यास सुरू केला. धोंडशेट म्हणजे एक साधा व्यापारी—त्यांतून जातीचा भंडारी—'गुरुजी' म्हणवून घेणारा मी पदवीधर त्यांच्या नजरेखालीं अभ्यास

करतों आहें याचं सर्वांनाच आश्चर्य वाटलं. गांवच्या लोकांमधें माझ्याबद्दल चांगलाच आदर उत्पन्न झाला होता. ते मला जसा विद्वान म्हणून लेखीत तसाच एक कर्तबगार माणूस समजत असत. धोंडशेटबद्दल गांवच्या लोकांत कोणत्याही प्रकारचा विशेष आदर नव्हता. गांवच्या चार प्रतिष्ठित माणसांप्रमाणंच तेही एक, असं समजलं जात होतं. पण वेदा–उपनिषदांचा अभ्यास करण्यासाठीं असा हा मी ज्यावेळीं त्यांच्याकडे जाऊं लागलों त्यावेळीं गांवच्या लोकांत धोंडशेटच्या योग्यतेबद्दल चर्चा सुरू झाली.

"हें काय वेड सुरू केलं आहे तुम्ही ?" किकी म्हणाली, "या असल्या अभ्यासांतून काय निष्पन्न होणार आहे ? आजच्या आपल्या कामाला वेद, उपनिषदं अन् श्रुतिस्मृतींची काय जरूरी आहे ?"

"आज याचीच जरूरी फार आहे." मी म्हटलं, "गांवांतल्या प्रत्येक माणसाची धर्मावर श्रद्धा आहे. आज जे रूढाचार चालत आले आहेत त्यांच्या अनुरोधानं धर्माची मर्यादा ठरवली जाते. मूळ धर्म काय आहे हें कुणालाच माहीत नाहीं. आम्हीं आपल्याला हिंदु म्हणवतों, पण हिंन्दु शब्दाचा खरा अर्थसुद्धां आपल्याला माहीत नाहीं—"

"म्हणजे ?" किकी म्हणाली, "हिंदु शब्दाला आज आपण समजतों त्याखेरीज निराळा का अर्थ आहे ?"

"आजच मला कळलं." मी म्हटलं, "धोंडशेटनीं मला दाखवून दिलं तेव्हां कुठं माझ्या ध्यानीं आलं, कीं तुकारामाच्या वाङ्मयांतसुद्धां हिंदु हा शब्द नाहीं. त्याच्या पूर्वीच्या ज्ञानेश्वर महाराजांच्या ग्रंथांतही हिंदु हा शब्द नाहीं ! शिवाजी महाराजांनीं जें राजकारण केलं त्यांतून 'स्वराज्य' हा शब्द निघाला. मराठ्यांचं राज्य म्हणजे स्वराज्य, असं समजलं जात होतं. हिंदुपदपादशाही हा जो शब्द वापरला गेला तो मुसलमानांच्या अनुषंगानं. मुसलमान लोक आम्हांला हिंदु म्हणत होते. हिंदु म्हणजे काफीर–बेरड–निरीश्वर–वादी–म्हणजे महंमद पैगंबरानं आपल्या धर्मात ईश्वराची जी व्याख्या केली आहे ती व्याख्या जे मान्य करीत नाहींत ते हिंदु, असं मुसलमान म्हणत होते. त्यावेळची राजवट मुसलमानांची होती. मुसलमानांची भाषा सर्वमान्य झाली होती. जुन्या मराठी भाषेत उर्दू आणि पर्शियन शब्द हळु हळु प्रवेश करूं लागले होते. तेच शब्द वापरल्याखेरीज त्यावेळीं गत्यंतर नव्हतं. शिवाजी महाराजांनीं ते मुसलमानी शब्द वापरूनच पहिल्यानं आपलं राजकारण सुरू केलं— त्यांना प्रचार करायचा होता–हातीं सत्ता असल्याशिवाय प्रचार होत नाहीं–ती सत्ता हातीं

नव्हती तोंपर्यंत त्यांनीं प्रचलित भाषेंतून प्रचार केला--पण ज्यावेळीं सत्ता पूर्णपणें हातीं आली त्यावेळीं जुनी भाषा मोडून नवी भाषा अस्तित्वांत आणण्यासाठीं त्यांनीं 'राजव्यवहार कोश' तयार करून घेतला. त्याचवेळीं स्वराज्य हा शब्द प्रचारांत आला. स्वराज्य म्हणजे आमचं राज्य. शिवाजीमहाराजांनीं तें आमचं राज्य स्थापलं. तें स्वराज्य स्थापल्यानंतर ते फार दिवस जगले नाहींत आणि म्हणूनच त्यांनीं प्रचारांत आणण्यासाठीं नवीन तयार केलेली परिभाषा यावी तशी अमलांत न येतां प्रचलित भाषेनं पुन्हां उचल खाल्ली. म्हणून शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर त्यांचा इतिहास लिहिणाऱ्या बखरकरांनीं 'हिंदुपदपादशाही' हा जुना शब्द पुन्हां रूढ केला. मुसल्मानांच्या प्रचलित भाषेला अनुसरून 'पादशाही' हा शब्द पुन्हां प्रतिष्ठित झाला होता. त्या पादशाहीच्या प्रतिष्ठेसाठींच हिंदुपदपादशाही हा शब्द पुन्हां प्रचारांत आणला गेला. मुसल्मानांच्या नजरेनं पाहिलं, म्हणजे स्वतःला हिंदु म्हणवून घेण्यांत आम्हांला शरमच वाटली पाहिजे !"

माझं तें व्याख्यान ऐकत असतां किकी अगदीं स्तब्ध झाली होती. मी नुसती पोपटपंची करीत होतों. 'हिंदु' शब्दाचा खरा अर्थ कळल्यामुळं तो शब्द टाकून 'आर्य' शब्द प्रचारांत आणणाऱ्या स्वामी दयानंदाचे अनुयायी असलेले धोंडशेट यांनींच मला ही माहिती दिली होती. ती माहिती साधार होती. उगीच कांहींतरी बोलायचं म्हणून धोंडशेट बोलले नव्हते.

मी थांबलों असं पाहून किकी म्हणाली, "श्रुतिस्मृतींच्या अभ्यासांतूनच का हा शोध लावलात ?"

"अर्थात नाहीं." मी म्हटलं, "श्रुतिस्मृतींच्या अभ्यासानंतरचा हा अभ्यास आहे. पण श्रुतिस्मृतींचा अभ्यास करायला जर मी सुरवात केली नसती तर हा प्रकाश मला मिळाला नसता. कुठल्या धर्माच्या अभिमानानं आपण झगडायचं? कशावर आधारला आहे आपला हा धर्म ?—"

उत्तरासाठीं मी क्षणभर थांबलों तेव्हां किकी म्हणाली, "खरंच, मोठाच प्रश्न आहे हा ! कधींच नव्हता आला माझ्या ध्यानांत—पण आपला हा धर्म गीतेवर आधारला आहे असा माझा समज होता."

"नाहीं–" मी म्हटलं, "आपला धर्म आधारला आहे स्मृतींवर. गीतेंत आहे तें आपलं तत्त्वज्ञान–तो धर्म नव्हे. पण आपण तो धर्म म्हणून समजतों. चार वर्णांच्या समर्थनासाठीं आपण गीतेचा आधार घेतों. पण वेदांत हा वर्णभेद नाहीं. वेदांत देवळं नाहींत, मंदिरं नाहींत, इतकंच नव्हे तर विभूतिपूजा आणि मूर्तिपूजासुद्धां नाहीं. वेद प्रमाण मानतो तो

आपला धर्म, पण वेदांनीं सांगितलेली प्रत्यक्ष दिसणाऱ्या पंचमहाभूतांची पूजा टाकून आपण दगडाधोंड्यांची पूजा करीत स्वतःला फसवतों आहोंत."

"एकूण या वर्णभेदावरच घाव घालायचा आहे तुम्हांला!" किकी म्हणाली.

"मला नव्हे—" मी म्हटलं "आम्हांला! ज्या प्रकारच्या सुधारणा करायच्या म्हणून आपण म्हणतों आहोंत त्यासाठीं आपल्याला वेदांचा आधार घेतला पाहिजे. गीता आधुनिक आहे, हें कुणीही सांगेल. बुद्धकालानंतरच्या पाणिनीनं व्याकरणाचे जे नवीन नियम बनवले त्या नियमांवर आधारलेल्या संस्कृत भाषेंत गीता लिहिली आहे—म्हणजे महाभारत लिहिलं आहे—इतकं तें आधुनिक आहे. स्मृतीसुद्धां त्याच भाषेंत लिहिल्या आहेत. म्हणून त्याही आधुनिक आहेत. कदाचित त्या गीतेच्या पूर्वीच्या असतील एवढंच. म्हणूनच आपल्याला वेदांकडे गेलं पाहिजे. अन् वेदांकडे गेलं, कीं आज आपल्यांत बोकाळलेला हजारों जातींचा प्रपंच खोटा ठरतो, इतकंच नव्हे, तर चार वर्णसुद्धां तितकेच खोटे ठरतात. म्हणून आपण आतां या लोकांना वेदांचा परिचय करून दिला पाहिजे. पुराणांच्या नांवाखालीं, पुराण म्हणजे जुन्या समजल्या जाणाऱ्या या आधुनिक कादंबऱ्यांवर विश्वास ठेवणाऱ्या अंधश्रद्धाळु लोकांचे डोळे उघडण्यासाठीं त्यांना वेदांचा परिचय करून दिला पाहिजे."

लक्षपूर्वक किकी माझं तें भाषण ऐकत होती. दाराजवळ उभी राहून जनीसुद्धां श्रोत्याचं काम करीत होती हें तोंपर्यंत माझ्या लक्षांत आलं नव्हतं. आमचं भाषण सुरू झाल्यानंतर मधेंच केव्हांतरी येऊन ती ऐकत राहिली असावी असं मला वाटलं. ती पुढं येऊन बोलूं लागली तेव्हांच तें माझ्या ध्यानीं आलं.

जनी म्हणाली, "असं आहे का हें? मग ह्या जाती आल्या कुठून?"

"हें पहा जने," मी म्हटलं, "जाती कुठून आल्या, केव्हां आल्या, कां आल्या, याच्या शोधाचा काथ्याकूट करीत बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं. वेदांत जाती नाहींत—वर्ण नाहींत—हें आपल्याला आतां कळलं. आतां आपण या पुढं जाऊंया आणि कामाला लागूंया."

"मी विचारलं कीं तुमचं हें असं चालतं," जनी म्हणाली, "अशिक्षित आहें ना मी! एवढा वेळ किकीला मारे व्याख्यान देत होतां अन् मी प्रश्न विचारतांच दांतखिळी कां बसते तुमची?"

"असं पहा जने," मी वडिलकीचा आव आणून म्हटलं, "ज्याला जितकं समजतं तितकंच त्याला तें सांगावं—"

" म्हणजे ? " जनी म्हणाली, " किकीला तेवढं समजतं अन् मला समजत नाहीं, असंच ना तुमचं म्हणणं ? किकी बी. ए. आहे, तुम्हीही बी. ए. आहांत. पण आज हें सारं शिकता आहांत कुणाकडून ? निमगांवच्या एका दुकानदार भंडाऱ्याकडूनच ना ? अन् तें मला समजणार नाहीं म्हणतां ?—बरं आहे. मीच जाईन धोंडशेटकडे. तुमची मध्यस्थी कशाला पाहिजे आहे मला ? "

" असं काय बोलतेस जने ? " किकी म्हणाली, " तुला कळत नाहीं असं का कुणि म्हटलं ? "

" आतां उगीच गिलावा करूं नका. " जनी म्हणाली, " ज्याला जितकं कळतं तितकंच त्याला तें सांगावं, असंच नाहीं का म्हटलं यांनीं ? असंच म्हणून यांनीं मला सांगायचं टाळलं ना ?—"

" बरं, बरं ! " मी म्हटलं, " ती चूक झाली माझी. मला वाटतं धोंडशेटची भाषा माझ्यापेक्षां तुलाच जास्त कळेल. आतां मी जें कांहीं किकीला सांगितलं तें माझ्या भाषेनं—धोंडशेटच्या नव्हे. त्यांनीं आपल्यापरीनं सांगितलेल्या गोष्टी मी माझ्या भाषेनं हिला सुनावित होतों, हें आतां माझ्या ध्यांनी आलं. मी तुला तसं उत्तर दिलं याचं कारण हेंच होतं. "

" मग चालूं दे तर तुमचं व्याख्यान. " असं म्हणून जनी निघून गेली.

" रागावली वाटतं ? " किकी म्हणाली, " फार हळवा आहे तिचा स्वभाव ! जातीसारखंच आहे हें—ब्राह्मणासमोर शूद्र माणूस आपल्या हलकेपणाच्या जाणिवेनं जसा आंग चोरून वागतो, तसंच हें शिक्षित अशिक्षितांचं चालतं. पण शिक्षणाचा हा माझा अभिमान आतां नाहींसा होऊं लागला आहे. रिकाम्या वेळीं मी जनीच्या आजीबरोबर बोलत बसतें, तेव्हां मला कळून येतं, कीं शाळाकॉलेजच्या शिक्षणानंच कांहीं ज्ञान येत नाहीं. सुभद्रेला अक्षरओळखसुद्धां नाहीं, पण ती म्हातारी एकेक बोलूं लागली म्हणजे मी केव्हां केव्हां अगदीं थक्क होऊन जातें ! तुम्हीं कधीं बसत नाहीं तिच्या गोष्टीला, नाहींतर तुम्हांला सुद्धां कळून आलं असतं. "

" तेंच चाललं आहे. " मी म्हटलं, " तिलाच संकोच वाटतो. मन मोकळं करून असं इतक्या दिवसांत ती एकदांच माझ्याशीं बोलली अन् तें सुद्धां या जनीच्या बाबतींत. केवढा गैरसमज झालाय या साऱ्या गांवाचा—" मी जनीचा सारा इतिहास सुभद्रेनं सांगितला होता

तसाच किकीला सांगितला. तो ऐकतांच ती स्तंभित झाली. अगदीं सुन्न होऊन तारवटलेल्या डोळ्यांनीं माझ्याकडे पहात ती म्हणाली, " असं आहे का हें ? मग माझं मन जें जनीकडे ओढ घेत होतं तें रक्ताच्या ओढीनं नव्हे तर ! आम्हीं भावंडं आहोंत असा माझा समज होता--" अगदीं रुक्ष आवाजांत ती बोलत होती. बोलतां बोलतां ती थांबली, डोळ्यांत आलेलं एकच लहानसं आसूं पदरानं टिपून घेऊन ती म्हणाली, " तसं नव्हतं तर हें ! मग कां मला एवढा जनीचा ओढा वाटत होता ? कां एवढा लळा लागला होता मला ? नुसत्या माझ्या समजानं ? रक्ताची ओढ आणि गैरसमजाची ओढ या दोन्हीं ओढी सारख्याच का असतात ? मी मुलगी म्हणून काकांनीं माझा छळ केला—मुलगी म्हणूनच ते जनीचा छळ करीत होते असं मी समजत होतें, आई केव्हां केव्हां कांहींतरी अस्पष्ट बोलून माझा गैरसमज दूर करायचा प्रयत्न करीत असे—पण त्यावेळीं मला तें खोटं वाटे—काकांवर पांघरूण घालण्यासाठीं आई मला खोटं सांगते आहे—" क्षणभर थांबून ती पुढं म्हणाली, " असं होतं तर हें ! "

विचार करीत ती कितीतरी वेळ उगीच बसली होती. तिची ती स्तब्धता मला भयानक वाटली. तें वातावरण मोडण्यासाठीं मी म्हटलं, " माझीच चूक झाली ही. मी सांगायला नको होतं तुला. सुभद्राच तुला स्वतः सांगणार होती. तिनं सांगितलं असतं तर तें निराळ्या भाषेंत सांगितलं असतं अन् त्याचा परिणामही असा झाला नसता—" एकदम माझ्या डोक्यांत कल्पना आली अन् मी घाबरून म्हटलं, " एवढ्यावरूनच जनी तुला दुरावल्यासारखी तर झाली नाहीं ? "

" त्याचाच विचार करतें आहें मी ! " असं म्हणून ती एकदम उठून निघून गेली.

माझ्या चुकीबद्दल मला पश्चात्ताप वाटूं लागला. दोघींचा एकमेकींबद्दल जो ओढा होता त्याची कारणं अगदींच निराळीं होतीं. जनीचं किकीबद्दल जें प्रेम होतं तें सहवासाचं होतं—आदराचं होतं—निस्सीम प्रेमाचं होतं. किकी जनीला जवळ करीत होती ती गैरसमजामुळं उत्पन्न झालेल्या एकारक्ताच्या जाणिवेमुळं. ब्राह्मणाचं बीज कुळवाड्याच्या क्षेत्रांत वाढलं, तरीही तें ब्राह्मणाचंच—तरीही तें आपलंच—असं समजून एका बीजाच्या मायेनं किकी जनीला वडिलकीच्या नात्यानं कुरवाळीत होती. तें अज्ञानांतलं प्रेम होतं.

आतां किकीला खरी हकिकत कळली—मला प्रश्न पडला, आतां या दोघींचे परस्परसंबंध बदलणार तर नाहींत ? जनीबद्दल मला खात्री होती. पण या नव्या जाणिवेमुळं किकीच्या मनावर काय परिणाम होईल याची अचुक कल्पना मला करतां येईना.

## प्रकरण दुसरें

# मी विचार करूं लागलों

जनीच्या हळव्या स्वभावामुळें मला पदोपदीं त्रास होणार कीं काय असं वाटूं लागलं. अगदीं क्षुल्लक वाटणाऱ्या बाबतींत सुद्धां तिच्या कुणबीपणावर आघात झाला तर तो तिला खपत नसे. वरिष्ठपणाच्या जाणिवेनं ब्राह्मण जसा आपल्या मोठेपणाला एवढासुद्धां धक्का बसलेला सहन करीत नाहीं, तशीच कुणब्याची जात आपल्या कनिष्टपणाच्या जाणिवेनं हळवी होऊन बसली आहे काय, असा प्रश्न मला पडूं लागला.

ती हकिकत कळल्यापासून किकीच्या वर्तनांत अगदीं नाजुक असा फरक झाल्याचं मला दिसून येत होतं. जनीबद्दल वाटणाऱ्या तिच्या आपुलकींत कुठं ना कुठं तरी उणीव उत्पन्न होऊं लागली होती. हें विष असंच रुजत जाईल कीं काय याची मला भीति पडली.

जनीला तें माहित नव्हतं. किकीकडे पहातांना ती पूर्वीच्या निर्मळ आपुलकीच्या दृष्टीनंच वागत होती. मात्र सुभद्रेच्या ध्यानीं तें आल्यावांचून राहिलं नाहीं. त्या दोघी नाहींत असं पाहून तिनं मला विचारलं, " जनीची हकिकत किकीला सांगितलीत का ? "

मी ओशाळून होकार दिला. तेव्हां ती म्हणाली, " एवढं तुम्हांला कसं कळत नाहीं, गुरुजी ? किती झालं तरी किकी ब्राह्मण आहे—तिचा तो अभिमान कांहीं केल्या

जायचा नाहीं—रागावूं नका, तुमचाही अभिमान जायचा नाहीं ! आधीं श्रीमंत, त्यांत ब्राह्मण, त्यांतून गांवचे अधिकारी असे तिप्पट वरिष्ठ असलेले बाबीकाका, त्यांची ती मुलगी. तिनं श्रीमंती टाकली, अधिकार टाकला, पण ब्राह्मणाच्या रक्ताचा अभिमान जो तिच्या रक्तांत आहे तो कांहीं केल्या जायचा नाहीं. निदान पांढरपेशेपणा तरी राहील. त्यांतून ती शिकलेली, बी. ए. झालेली, हा आणखी एक वरिष्ठपणा आलेला—छेः अगदीं चुकलांत तुम्ही ! " मी ओशाळून मान खालीं घालून बसलों होतों असं पाहून ती म्हणाली, " रागावूं नका. मी तुमच्या घरची मोलकरीण आहें. तुम्हीं धनी आहांत, मी चाकर आहें. चाकराच्या नात्यानं मी चाकरी करीन, पण वडिलकीचं नातं आलं, कीं मी वडिल आहें आणि तुम्हीं पोर आहांत. मी खुळीभोळी कुणब्याची बायको असलें तरी मी वडिल आहें. तुमच्यापेक्षां जगाचे चार अधिक धक्के मी खाल्ले आहेत. तसं म्हटलं तर जगाचे धक्केच मुळीं अजून तुम्हाला खायला मिळाले नव्हते—नुकती कुठं सुरवात झाली आहे—पण माझा जन्म मात्र सारखा दुसऱ्याच्या लाथा खाण्यांत गेला आहे. अशा लाथा मी खाल्ल्या आहेत म्हणून मला तुमच्यापेक्षां जास्त अक्कल आली आहे. म्हणूनच मी जशी वडील आहें तशीच जास्त अक्कलवान आहें. माझं ऐकलं नाहींत ही मोठी चूक केलीत ! जाऊं दे, आतां हें कसं सावरून घ्यायचं तें माझं मलाच पाहिलं पाहिजे ! " असं म्हणून तीं आपल्या कामाला लागली.

माझ्या चुकीची जाणीव मला आधींच झाली होती त्यामुळं सुभद्रेची ही कानपिळणी मला अधिक झोंबली. मला प्रश्न पडला, नोकराचा नोकरपणा वडिलकीच्या आड येत नाहीं का ? कुठं कुठं नोकरलोक धन्यावर सत्ता गाजवतात असं मी मुंबईत पाहिलं होतं. मोठमोठे गुजराती व्यापारी घरच्या रामागड्याच्या वडिलकीवर आपलं घर विसंबून रहात होते, ते याच आधारावर का ? इकडेही कदाचित तशीं उदाहरणं असतील—मला अजून तीं पाह्यला मिळाली नव्हतीं—

मी विचार करूं लागलों तसतशी माझी मलाच लाज वाटूं लागली. उच्च-नीच भेदाची कारणं किती सूक्ष्म असतात आणि त्यांच्या कार्यकारणभेदानं अधिकाराची कशी उलटापालट होते याची अंधुकशी कल्पना मला येऊं लागली.

जरी हें सुभद्रेच्या ध्यानीं आलं तरी जनी मात्र पूर्वीच्या जिव्हाळ्यानंच वागत होती. हल्लीं ती फार खुषींत असे. तिनं आपलं सारं लक्ष कपड्यांची निपज करण्याकडे लावलं होतं. बारा मागाचे सोळा माग झाले होते. या सोळांची दुप्पट कशी होईल या महत्वाकांक्षेनं ती सुताची

पैदास करण्याच्या उद्योगाला लागली होती. त्या उद्योगांत ती इतकी रंगून गेली होती, कीं किकीच्या वर्तनांत उत्पन्न झालेला तो नाजुक फरक तिच्या लक्षांत आला नाहीं.

माझ्या आयुष्यांतले ते दोन विलक्षण प्रसंग मात्र मला सारखे जाणवत होते. आईच्या मृत्यूनंतर किकीनं केलेला अविचार आणि लग्नाच्या गोष्टी निघाल्यावर जनीनं दाखवलेला दुबळेपणा—या दोन्हीही प्रकारांचा माझ्या मनावर विलक्षण परिणाम होऊन राहिला होता. त्या प्रकाराबद्दल त्या दोघींना काय वाटत होतं तें मला कळणं शक्य नव्हतं. दोन्ही प्रकारांची जाणीव जनीला होती, पण जनीच्या हातून घडलेल्या त्या हळवेपणाची जाणीव किकीला नव्हती.

मी त्या गोष्टींचा कधींच उल्लेख करीत नव्हतों, त्याचप्रमाणें त्या दोघीही त्या प्रसंगाची जाणीव ठेवून माझ्याशीं वागत नव्हत्या. ती जाणीव त्यांनीं ठेवली असती, एवढासा जरी संकोच दाखवला असता, तर मला निमगांव सोडून जाणंच भाग पडलं असतं.

त्या प्रकाराची पुनरुक्ति करणं किंवा तसल्याच कांहींतरी भावनावशतेचं प्रदर्शन करणं त्यानंतर दोघींनीही टाळलं होतं म्हणूनच मी सांवरून उभा राहिलों होतों.

तरीही माझ्या मनाची खळबळ थांबत नव्हती. मला प्रत्यक्ष दिसत होतं, कीं दोघींनांही माझ्याबद्दल एक प्रकारचं आकर्षण होतं. त्या आकर्षणाची छाननी मला करता येत नव्हती. 'प्रेम, प्रेम' म्हणून जें कांहीं म्हणतात त्याची जनीला ओळख नव्हती. आणि प्रेमाच्या भावनेचा किकीला तिटकारा होता. लग्नाची कल्पना तिला दुःसह नव्हती—किंबहुना लग्न केल्याखेरीज आपल्याला गत्यन्तर नाहीं असं जरी तिला वाटत होतं तरी प्रेमाच्या आणि लग्नाच्या भावनेचे परस्पर संबंध आज ज्या स्वरूपांत जोडले जातात तो प्रकार मात्र तिला पटत नव्हता.

जनीची लग्नाची कल्पना पारंपरिक होती. लग्न केल्याखेरीज बायकांच्या जातीला गत्यंतर नाहीं म्हणूनच लग्न करणं अवश्य आहे असं तिला वाटत होतं. मानसिक आकर्षणाबरोबरच शारीरिक दुबळेपणाही तिला जाणवत होता. पण आजन्म ब्राह्मणांत वाढल्यामुळं आणि त्यांतून आतां या आमच्या नव्या कुटुम्बपद्धतींत, अगदीं थोडा काळच कां होईना, आयुष्य गेल्यामुळं घरठाव करण्याची तिची नजर साफ बदलली होती.

या प्रकरणीं माझं स्वतःचं मत काय आहे याचा मी स्वतःलाच प्रश्न केला, तेव्हां मला कांहींच उत्तर देतां आलं नाहीं. पहिला प्रश्न मनांत उभा राहिला तो हा, कीं लग्न

करून संसार थाटावा असं मला मनःपूर्वक वाटतं आहे का? मग कॉलेजांत असल्यापासून मी स्थळ हेरीत होतों तें कां म्हणून ?

एकदां असं वाटे, कीं लग्नाच्या भानगडींत पडूं नये. मी जें काम पत्करलं होतं त्यांतून मला जो मोबदला मिळत होता तो मोबदला लग्न करून संसार थाटायला पुरेसा नव्हता. कदाचित यापुढं मला जास्त पगार मिळाला असता—तसं पाहिलं तर या पगारांतसुद्धां गरिबीचा संसार थाटून मला राहतां आलं असतं. आज मी जरी लग्न केलं नव्हतं, तरी संसार थाटून बसलों होतों. त्या संसाराचा खर्च चालत होता. लग्न करून संसार थाटण्याइतकं उत्पन्न आपल्याला मिळत नाहीं अशी जी कल्पना माझ्या मनांत आली, ती स्वाभाविकपणें असलेल्या माझ्या मुंबईच्या दृष्टीची होती. खेड्यांतली दृष्टि अजून माझ्या आंगीं पुरतेपणीं बाणली नव्हती. खेड्यांतल्या दृष्टीनं मी पाहिलं असतं तर प्रत्यक्ष अनुभवावरून लग्न करून संसार थाटणं मला अशक्य झालं नसतं, पण—

पण दुसरा प्रश्न होता तो हा, कीं आज मी ज्या प्रकारें आयुष्य कंठीत होतों त्याच परिस्थितींत राह्यची माझी तयारी होती का? कीं तशी तयारी नसल्याची जाणीव कुठंतरी अंतः-करणाच्या सांदीकोंपऱ्यांत होती म्हणून मला तसं वाटलं ?

मी माझ्या मनाचा ठाव घेऊं लागलों. मन अगदीं दुश्चित होऊं लागलं—अगदीं कावून गेल्यासारखं वाटूं लागलं. आजच कुणी माझ्या लग्नाचा प्रश्न काढला नव्हता. पण झाल्या प्रकाराच्या आठवणीमुळं माझ्या मनावर जो परिणाम होत होता त्यामुळं असा कांहीं तरी विचार केल्यावांचून राहाणं मला कठीण गेलं. कुणाला तरी विचारावं असं वाटलं, पण विचार-णार कुणाला ? हा प्रश्न किकीला का विचारायचा ? तो प्रश्न विचारायला किकीशिवाय—जनीशीवाय देखील मी म्हटलं असतं—मला दुसरं कोण होतं ? जिव्हाळयाचं म्हणून म्हणा-यला या जगांत मला कुणीच नव्हतं. मुंबईत असतांना देखील मी कुणी मित्र जोडले नव्हते. जे कांहीं मित्र जोडले ते निमगांवांत आल्यावर. मला इथं आणण्यांत पुढाकार जरी अण्णांनीं घेतला होता तरी वडिलकीच्या दृष्टीनं धोंडशेटबद्दलच मला जास्त आदर वाटत होता. एकदां असं वाटलं, या कामीं धोंडशेटचा सल्ला घ्यावा का ?

तसं करायला मन धजेना ! कुठं तरी मन खटकत होतं. सुशिक्षितपणाची जाणीव वर उसळून येत होती. वेदा–उपनिषदांचा अभ्यास धोंडशेट यांनीं कितीही केलेला असला तरी

पदवीधराचं—त्यांतून ब्राह्मण पदवीधराचं—अंतःकरण अजमावायची यथार्थ कल्पना धोंडशेटना असेल असं मला वाटेना.

अशा रीतीनं धोंडशेट बाजूला पडले. अण्णांना विचारावं असं मनांत सुद्धां येत नव्हतं. किकीला विचारणं तर शक्यच नव्हतं. जिव्हाळ्याचीं नातीं जोडलेलीं अशी हीं तीन माणसं !—

आणि जनी नव्हती का ? तो विचार मनांत येतांच मला कसंसंच वाटलं. माझ्या घरचं सैंपाकीण—मोलकरणीचं काम करणारी जनी म्हणजे मी जोडलेली मैत्रिण ठरते का ? जनीच्या अशिक्षितपणामुळंच का मला असं वाटलं ? शिक्षणाचा संस्कार झाला नाहीं तरीही तिची मूळ बुद्धिमत्ता असाधारण होती. कांहीं बाबतींत ती किकीपेक्षांही जास्त व्यवहारी होती. चार इंग्रजी ग्रंथ जरी तिला वाचतां आले नसते तरी खेडेगांवच्या व्यवहाराच्या अत्यंत बिकट भाषेचं पुस्तक तिनं चांगलंच अभ्यासलं होतं.

या व्यवहारांत सहीसलामत वावरायला मी आणि किकीपेक्षां ती जास्त अधिकारी होती. इथल्या कामांत इतर कुणापेक्षांही तीच आम्हांला जास्त मार्गदर्शक झाली होती. हा सार्वजनिक प्रपंच चालवायला अवश्य असणारी कर्तबगारी आम्हां दोघांपेक्षां तिच्या ठायींच जास्त होती. किंबहुना आमचा हा सर्व प्रपंच—शाळा खेरीज करून—तिच्याच कर्तबगारीवर यशस्वी होऊं लागला होता.

मग तिच्याबद्दल मला असं कां वाटलं ? स्वैंपाकीण म्हणून ? मोलकरीण म्हणून ? आमच्या संसारांतली गृहिणी तरी सैंपाकीणमोलकरीणच नसते का ? जुन्या काळच्या नजरेनं पहायचं तर कुठलीही गृहिणी सैंपाकीणमोलकरणीच्या दर्जापलीकडे जाऊं शकत नव्हती. नव्या दृष्टीनं पाहिलं तरीही मोठासा फरक काय होता ? ती सैंपाकीणमोलकरीण फार तर फुरसतीच्या वेळांत चार दोन वर्तमानपत्रं किंवा इंग्रजी पुस्तकं वाचीत बसली असती किंवा नसतीही.

पदवीधर गृहिणींची पदवी आमच्या या संसारांत कितीशी उपयोगी पडत होती ? माझ्या पूर्वींच्या कित्येक मुली बी. ए. होऊन संसारांत पडल्या होत्या, त्या तरी काय करीत होत्या ? कोणत्याही अशिक्षित गृहिणीपेक्षां कोणती जास्त कर्तबगारी दाखवीत होत्या ? संसाराचा कोणता बोजा अशिक्षित गृहिणीपेक्षां जास्त प्रमाणांत वाहून नवऱ्याचा भार त्या हलक्या करीत होत्या ? झाला तर नवऱ्याला त्या बायकोच्या पदवीचा उपसर्गच होत होता. अशिक्षित गृहिणीला बिनतक्रार राबवून तरी घेतां येतं—पण सुशिक्षित गृहिणीच्या पायीं तिच्या नवऱ्याचा घरखर्च मात्र जास्त वाढत जातो हें मी प्रत्यक्ष पाह्यलं होतं.

# मी विचार करूं लागलों

असं असतां मला जनीबद्दल असह्य वैषम्य कां वाटलं ? किकीच्या तुलनेनं तिच्या-कडे पहातांना माझी नजर अशी दूषित कां झाली ? कां मी कमी लेखलं तिला ?

माझा मलाच राग येऊं लागला. मन अगदीं कातावून गेल्यासारखं झालं. कशाला हा विचार करायला हवा ? आज काय अडलं आहे त्या वांचून !

आज नाहीं उद्यां—पण केव्हांतरी हा विचार केला पाहिजे होताच ना ? मग आजच तो विचार कां करूं नये ? ज्याप्रकारच्या प्रसंगांतून मला जावं लागलं होतं त्यांत जरी मी अलगपणें राहिल्यासारखं दाखवलं, तरीही व्हायचा तो परिणाम माझ्या मनावर झाला होता. म्हणूनच मला विचार केल्यावांचून रहावत नव्हतं. पुन्हां पुन्हां तोच विचार येई आणि मनाचा धडा करून मी तो विचार दूर लोटून देण्याचा प्रयत्न करीं.

किकीला काय वाटत होतं हें जरी मला सांगतां आलं नसतं, तरी या प्रकरणीं जनी मात्र अस्वस्थ झाली होती असं मला पदोपदीं दिसून येई. 'एवढंच ?' असं म्हणून ज्या मुद्रेनें तिनं माझ्याकडे पाहिलं होतं ती तिची काकुळतवाणी दृष्टि, वेळीं अवेळीं तिनं कोणताच उद्गार काढला नाहीं तरी, माझ्या नजरेला येई. मी तिला शिकवायला बसलों, एकादा धडा समजावून देऊं लागलों, तर अन्यमनस्क होऊन ती त्या तसल्याच दृष्टीनं केव्हां केव्हां माझ्याकडे पहात राही, आणि मी बळेंच रागावण्याचा आव आणला म्हणजे माझी क्षमा मागून आपल्या धड्याकडे लक्ष लावी. आम्ही तिघंही बोलत बसलों तरी त्यावेळीं देखील तिची ती मुद्रा कारण नसतांना मला दटावित असल्याचा मला भास होई.

जनीचा स्वभाव बोलका नव्हता. तसं पाहिलं तर ती आंतल्या गांठीची होती. परिस्थितीनं तिला तसं बनवलं होतं. म्हणूनच ती कांहीं बोलत नसे. असल्या विषयांत मन मोकळं करून बोलण्याची मुभा असती तर ती पुन्हां माझ्या गळीं पडली असती अशी भीति मला वारंवार वाटे. अलिकडे तिचा स्वभाव जरा अंगचोर झाला होता. पूर्वीच्या इतक्या मोकळेपणानं ती माझ्याशीं वागत नसे. त्या प्रसंगानंतरच तिची वृत्ति अशी बनली होती.

लवकरच या प्रकरणाचा कांहीं तरी निकाल लावल्याशिवाय आमचं तें जगावेगळं कुटुंब सुखासमाधानानं चालणार नाहीं असं मला वाटूं लागलं.

## प्रकरण तिसरें

# आमचा शिमगा सुरू झाला

निमगांवांत शिमग्याच्या सणाचं फार मोठं प्रस्थ होतं. गांवच्या दृष्टीनं हा एक मोठ्यांतला मोठा सण समजला जात असे. होळीच्या पूर्वी दहा दिवस रोज कांहीं तरी करमणुकीचे कार्यक्रम असत. या कार्यक्रमाबरोबरच रोज रात्रीं आट्यापाट्याचा खेळ सुरू असे. मुंबईच्या क्रिकेटच्या सामन्याइतकंच निमगांवच्या दृष्टीनं या आट्यापाट्यांच्या सामन्यांना महत्त्व असे. त्याशिवाय सुमारें दहा दिवस गाडीतळावर तमाशे होत असत. देवळाच्या दारांत ढोलतासे घेऊन वेळीं अवेळीं गांवचीं उनाड मुलं उगीच वाजवीत बसत असत, तें वेगळंच.

मुख्य मिरवणुकी, होळीच्या दिवशीं एक आणि रंगपंचमीच्या दिवशीं दुसरी, अशा दोन जरी सार्वत्रिक मिरवणुका होत्या तरीही पूर्णिमेनंतर पांच दिवस निरनिराळीं सोंगं आणि रोम्बटं यांच्या मिरवणुका असत त्या वेगळ्याच.

करमणुकीचं आकर्षण या दृष्टीनं यांतले दोन कार्यक्रम फार महत्त्वाचे असत. एक रोम्बट आणि दुसरा तमाशा. या रोम्बटाची कल्पना बाहेरच्या लोकांना फारशी नाहीं. पूर्वी या रोम्बटाचं स्वरूप ललितासारखं होतं असं मला सांगण्यांत आलं. म्हणजे नुसतीं निरनिराळीं सोंगं आणून त्या सोंगांनीं भूमिकेला अनुसरून अशीं भाषणं करून सोंगाची बतावणी करायची. नाटकाच्या

प्रसाराबरोबर हा ललिती प्रकार बंद झाला आणि चालू नाटकांतील साधारण अर्ध्या तासाचे प्रवेश निवडून ते प्रत्येकाच्या दारोदार जाऊन करून दाखवण्यांत येऊं लागले.

या प्रवेशांतील सर्व नट ( अर्थात् स्त्री-पार्टीही ) सजवलेल्या सोंगांनीं पुढं वाद्यं वाजत मिरवणूक काढीत रस्त्यानं जात आणि कांहीं मानकऱ्यांच्या घरीं, त्याचप्रमाणं जे कुणी मुद्दाम आमंत्रण देतील त्यांच्या दारीं जाऊन, अंगणांत उघडी रंगभूमी थाटून हा प्रयोग करून दाखवित असत. प्रयोग संगीत असला तर पेटीवाला तबलजी देखील आपलीं हत्यारें घेऊन या मिरवणूकीबरोबर हजर असे. ज्यांच्या दारीं हे प्रयोग होत ते आपल्या सामर्थ्याप्रमाणें कांहीं तरी बिदागी देत. त्या बिदागींतूनच हीं रोम्बटं बनवण्याचा व करण्याचा खर्च भागवण्यांत येई. उत्पन्न कांहीं शिल्लक राहिलंच तर शिमग्याच्या शेवटीं या रोम्बटांत काम करणाऱ्या सर्व माणसांना एकादी थाटाची मेजवानी देण्यांत येई. अर्थात ही सर्व मंडळी गांवातलीच असे. मुंबईला रंगभूमीवर आलेल्या अगदीं नव्यांतल्या नव्या नाटकांतले प्रवेश निवडून करण्यासाठीं निरनिराळ्या रोम्बटांच्या ताफ्यांची चढाओढ लागत असे.

तमाशाच्या बाबतींत मात्र अगदींच निराळी व्यवस्था होती. रोम्बटांप्रमाणें हे तमासगीर स्थानिक नसत. या शिमग्याच्या दिवसांत ग्रामदेवतेची मूर्ति बाहेर आणून एका विशिष्ट जागीं मंडप घालून तिची स्थापना करण्यांत येई. शिमग्याचे हे दहा दिवस देवाची बैठक त्या मंडपांतच असे आणि तिच्यापुढें हे तमाशे करण्यांत येत. तमासगीर लोक बहुधा वर्षासनवाले असत. कित्येक वर्षे तीच तमासगीर मंडळी प्रतिवर्षी येऊन देवस्थानाकडून ठरवलेला तोच मेहनताना घेऊन जाई. त्याशिवाय तमाशा सुरू असतांना ' दौलतजादा ' चें जें उत्पन्न होई तें वेगळंच. या उत्पन्नाखेरीज उत्सव संपल्यावर या तमासगिरांचे तमाशे हौशी लोक ठिकठिकाणीं करवीत, तेंच उत्पन्न धंद्याच्या दृष्टीनं या लोकांना महत्त्वाचं होतं. देवस्थानाकडून मिळणारी तैनात त्या मानानं अगदींच सामान्य असे.

या तमाशाला आजुबाजूच्या खेड्यांतले शेंकडों लोक येत असत. रोज तळावर हजारों लोकांची गर्दी होई आणि त्या हजारों लोकांतून कांहीं निवडक लोक आपल्या शक्त्यनुसार तमासगिरांचा ' दौलतजादा ' करीत.

हा एक धार्मिक विधि समजला जाई. हे तमासगीर बहुधा महार किंवा कोल्हाटी असत. तमाशाचं स्वरूप सर्वस्वी अश्लीलतेनं भरलेलं असलं, तरी त्यांतील ' बतावण्या ' म्हणजे

पौराणिक खंडप्रवेश असत. राधाकृष्णाच्या शृंगारचेष्टांच्या वर्णनाखालीं शारीरशास्त्राची अत्यंत नाजुक चर्चा उघड्या भाषेंत केली जाई.

तसं पाहिलं तर हे तमासगीर मोठे कलाकुशल होते. हजरजबाबी तात्कालिक विनोद करण्यांत त्यांचा हातखंडा होता. या विनोदाला अश्लीलतेची छटा असली तरी रसिकतेचं नाजूक स्वरूप त्यांत दिसल्यावांचून रहात नसे. ज्या लावण्या आणि छकडा म्हटल्या जात त्या बऱ्याचशा अश्लील असल्या तरी काव्याच्या दृष्टीनें उच्च दर्जाच्या होत्या असें मला तरी वाटलं. कांहीं सोज्वळ लावण्याही म्हटल्या जात असत—नाहीं असं नाहीं. पण मागणी असे ती या अश्लील लावण्यांना. बापलेक, अगदीं लहान मुलंसुद्धां एका जागीं बसून ह्या लावण्या मिटक्या मारीत ऐकत. त्याबद्दल कुणाला संकोच वाटत नसे. मला असं दिसून आलं, कीं या अश्लीलतेची जाणीव श्रोत्यांना मुळींच नसे. अगदीं घरगुती दृष्टीनं ही अश्लीलता ऐकली जात होती. जेवणं खाणं, हिंडणं फिरणं, प्रवास करणं, वगैरे प्रसंगाबरोबरच, समाजांत अस्तित्वांत असलेले पण उघडपणें होत नसलेले, सांसारिक प्रसंग या बतावण्यांतून वर्णिले जात असतांना, अगदीं निर्मळ मनानं श्रोते तीं वर्णनें ऐकत असल्याचं पाहून मला पहिल्यानं धक्का बसला.

हा प्रकार ह्या खेडेगांवच्या लोकांच्या इतका आंगवळणीं पडला होता, कीं त्यांत कांहीं विशेष आहे—टाकाऊ आहे असं कुणालाच वाटत नसे. ‘गांवांत’ ग्राम्यतेची कल्पना कां यावी? ‘ग्राम्य’ शब्द असाच का प्रचारांत आला? ही ग्राम्य वृत्ति स्वाभाविक होती कीं अस्वाभाविक होती? जीं वर्णनं ऐकून माझ्या अंगावर शहारे आले तींच वर्णनं अगदीं स्वाभाविक रितीनं गांवचा लहानमोठा श्रोता एवढासुद्धां विकल्प मनांत न येतां कसा ऐकतो याचं मला आश्चर्य वाटलं.

निरनिराळ्या उत्सवांत देवळांतून कीर्तनं होत. पण त्यांना बहुधा प्रतिष्ठित लोकांचीच गर्दी असे. कीर्तनांत सांगितल्या गेलेल्या कथानकांचं ‘ग्राम्य स्वरूप’ या तमाशांत असे. म्हणूनच का सर्वसाधारण बहुजनांची इथं गर्दी होत होती? प्रतिष्ठितांसाठीं प्रतिष्ठित स्वरूपाचं कीर्तन, तसाच ग्राम्य लोकांसाठींच का हा ग्राम्यस्वरूपाचा तमाशा?

या तमाशाबद्दल अण्णांना कांहीं विशेष वाटत नव्हतं. पण धोंडेशेट मात्र शिमग्यांत होणाऱ्या प्रत्येक प्रकारच्या प्रत्येक उत्सवाबद्दल चिडून विरोध दाखवीत असत. मी पहिल्यानं इथं आलों त्यावेळीं या उत्सवांत मिसळलों नव्हतों, इतकंच नव्हे, तर हे उत्सव कसे होतात हें मी डुंकूनसुद्धां पाहिलें नव्हतं. पण या वर्षी ज्यावेळीं मी उघड्या डोळ्यांनीं पाहूं लागलों त्यावेळीं

खेडेगांवांत या उत्सवांचं महत्त्व किती मोठं आहे याची कल्पना मला आली. राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाची जितकी गडबड पूर्वी शहरांत होई तितकीच गडबड आणि तितकाच उत्साह या शिमग्याच्या उत्सवासाठीं खेड्यांत दाखवला जाई. खेड्यांतली प्रत्येक सामुदायिक चळवळ अशा कोणत्याना कोणत्या तरी धार्मिक बाबीवर आधारलेली आहे असं जेव्हां मला दिसून आलं, त्यावेळीं कोणत्याही प्रकारची सामाजिक सुधारणा करणं खेड्यांत किती बिकट आहे याची बरीचशी कल्पना मला आली. आणि त्याच दृष्टीनं प्रचारकार्यांतील आमचे निरनिराळे प्रयोग कसे करायचे याचा मी विचार करूं लागलों

धोंडशेटना या प्रकारांची चीड होती. हे सारे प्रकार एकदम बंद झाले पाहिजेत असा त्यांचा आग्रह होता. हे प्रकार बंद करण्याचे प्रयत्न त्यांनीं आपल्या परीनं करून पाहिले तरी त्यांत यश न आल्यामुळं ते स्वतः बाजूला सरले—पण त्यामुळं कांहींच कार्यभाग झाला नाहीं. जें व्हायला नको होतं तें होत राहिलं होतं आणि तें बंद करण्याची ताकद त्यांच्या ठिकाणीं नाहीं म्हणून धोंडशेट मात्र गांवाच्या दृष्टीनं या कामीं अधर्मी आणि दुबळे ठरले होते.

उघड्या विरोधानं हें काम होणार नाहीं असं मला वाटूं लागलं. अस्पृश्यतानिवारणाचा एक कार्यक्रम आमच्या समोर होता. पण त्या कामीं आजवर आम्हांला कांहीं करतां येत नव्हतं. या कामाला सुरवात करायला या शिमग्याच्या उत्सवांतून मला एक आधार सापडला. ढोल वाजवणं हें महाराचं काम. तासेवाजंत्री जरी शूद्र वर्गातले असले तरी त्यांतला कुणीही केव्हांच ढोल वाजवायला तयार झाला नसता. शिमग्याच्या दिवसांत ढोलाला मोठं प्राधान्य असल्यामुळं महाराला मोठा मान असे. अडवून चार पैसे उकळण्याची संधि महाराला याच वेळीं मिळे. प्रत्येक ठिकाणीं ढोल पाहिजे होता आणि महाराखेरीज इतर कुणी ढोल वाजवणं शक्य नव्हतं. म्हणून महार अशावेळीं बहुधा आजारीपणाचं ढोंग करून गांवकऱ्यांकडून पैसे उकळीत असे आणि पैसे उकळूनही आपण अशा परिस्थितींत येऊन उत्सव साजरा केला या उपकाराचा बोजा गांवकऱ्यांच्या माथ्यावर चढवीत असे.

या शिमग्याच्या उत्सवांत असा एकच दिवस असे, कीं त्या दिवशीं महाराची कदर कुणी करीत नसे. होळीच्या रात्रीं महारानं आपला ढोल खालीं ठेवायचा आणि गांवच्या प्रत्येक मानकऱ्यानं गळ्यांत ढोल घालून तो वाजवायचा, असा शिरस्ता होता. त्या दिवशीं बिचारा महार केविलवाणं तोंड करून ढोल वाजवीत असलेल्या या साऱ्या ब्राह्मणांपासून शूद्रापर्यंतच्या साऱ्या मानकऱ्यांकडे पाहून उदासवाणा होत असे. एक दिवस आपला अधिकार गेला अस

महाराला वाटे आणि एक दिवस आपण हा अधिकार मिळवला या अभिमानानं प्रत्येक पांढरपेशा बेहोश होऊन ढोल बडवीत असे. ढोल गळ्यांत बांधणं आणि ढोल वाजवणं या प्रकाराच्या मुळाशीं जी अस्पृश्यतेची भावना होती—जबरदस्त भावना होती— त्या भावनेचा हलकेपणा विसरून प्रत्येक पांढरपेशा एक दिवसापुरता महार होण्याचा हा मोठा मान आपण संपादन केला अशा अभिमानानं मिरवत असे. त्या दिवशीं महाराची शिवाशीव कुणी पाळीत नसे आणि ढोल घातल्याचं प्रायश्चित्त म्हणून कुणी स्नानही करीत नसे. या दिवशीं असं स्नान केलं, म्हणजे अस्पृश्यतेची कल्पना मनांत आणली, तर पाप लागतं असा प्रत्येकाचा दृढ विश्वास असे.

उम्या वर्षांत एक दिवस इथं अस्पृश्यतानिवारण होत आहे हें पाहून मला आनंद वाटला आणि या सुतानं स्वर्ग कसा गांठावा याचा मी विचार करूं लागलों.

शिमग्याच्या उत्सवापूर्वी मुंबईच्या तरुण विद्यार्थ्यांपैकीं कांहीं विद्यार्थी निमगांवांत आले होते. अस्पृश्यतानिवारणाच्या पूर्वीच्या सभेंत ज्यानीं मला विरोध केला तेच हे विद्यार्थी होते. इथं आल्याबरोबर त्यांनीं शिमग्याच्या उत्सवाविरुद्ध चळवळ करण्यास सुरवात केली. पूर्वीच्या इतिहासाचा आधार धरून त्यांनीं या कामीं धोंडशेटचा पाठिंबा मिळविला. या बाबतींत मी अगदीं तटस्थ राहिलों होतों. सार्वत्रिक विरोध उत्पन्न होईल अशी कोणतीही गोष्ट करायची नाहीं असा मी निश्चय केला होता. मला गांवकऱ्यांची सहानुभूति पाहिजे होती. त्यांच्या ज्या रूढ समजुती होत्या, त्या समजुतींमागं जी एक अनिर्वचनीय अशी धर्मभावना होती, त्यांच्यावर एवढासुद्धां आघात केलेला त्यांना चटकन् जाणवत असे म्हणूनच या विरोधकांशी मी जरी सहमत होतों तरीही त्यांच्या कोणत्याच कार्यक्रमांत भाग घेण्याचं मी टाळलं.

किकीला तें आवडलं नसावं. तिनं प्रत्यक्ष तसं बोलून दाखवलं नाहीं. वळणावळणानं तिनं माझी कानउघाडणी करायचा प्रयत्न केला.

त्या दिवशीं धोंडशेटच्या अध्यक्षतेखालीं या नव्या तरुणांनीं सभा भरवून व्याख्यानं दिलीं. त्या सभेला मी हजर राहिलों नव्हतों. धार्मिकतेच्या नांवाखालीं होत असणाऱ्या अश्लील प्रकारांवर टीका करण्याचं ज्यावेळीं या तरुण व्याख्यात्यांनीं सुरू केलं, त्यावेळीं श्रोत्यांनीं त्यांची हुर्रेवडी केली. धोंडशेटनां सुद्धां कुणि बोलूं देईना.

सभा उधळली गेली आणि या सभेला हजर राहिलेली किकी आंबट तोंड करून घरीं आली.

आल्यापासून ती सारखी फणफणत होती. गांवकऱ्यांच्या मुर्खपणावर कोरडे हाणीत होती. ती मला म्हणाली, " आज अगदीं भेकडपणा दाखवला तुम्हीं. या सभेला तुम्हीं हजर राहिलं पाहिजे होतं. अत्यंत महत्त्वाच्या अशा या बाबींतली सुधारणा जर तुम्हीं करायची नाहीं तर आलांत कशाला या गांवीं ? किती ओंगळ प्रकार होतात या शिमग्यांत ! पाहिलेत ना ते ? धोंटशेटना सुद्धां आज कुणी बोलूं दिलं नाहीं. तुम्हीं असतां तर त्यांची अशी फजिती झाली नसती. केवढा भेकडपणा केलात हा ! "

तिचा तो त्वेष पाहून जनी मोठमोठ्यानं हंसूं लागली तेव्हां तिचा संताप आणखी वाढला. रागानं फणफणत ती म्हणाली, " हंसायला लाज नाहीं वाटत तुला जने ? त्यांतलीच ना तूं ? तुलादेखील शिमगा हवा आहे. ती बोंब, ते तमाशे, तीं रोम्बटं, तें ढोल बडवणं, हा सारा धुमाकूळ पहातांना आम्हांला कशी चीड येते हें कसं कळायचं तुला ? साऱ्या रोम्बटांमागून तूं हिंडतेस, मिरवणुकीमागून तूं फिरतेस, तमाशालासुद्धां जातेस ! होय ना ?—"

" हो– " जनी म्हणाली, " ल्हानपणापासून तेंच करीत आलेय मी. मला कांहीं वाटत नाहीं त्यांत ! "

" ती घाणेरडी भाषा ऐकतांनासद्धां ? " किकीनं विचारलं.

" कुणब्याच्या घरची भाषा तुम्हीं ऐकली नाहीं ! " जनी म्हणाली, " रोज शिमगा चालत असतो आमच्या घरांत. रोज हीच भाषा ऐकतों आम्हीं. तुम्हांला तेवढी शिमग्यांत ऐकूं येते. पण आमच्या घरांतून हा शिमगा रोज चालला आहे हें तुम्हां लोकांना कुठं माहित आहे ? वर्षांतून एकच दिवस तुम्हीं ही भाषा ऐकतां म्हणून तुमच्या अंगावर शहारे येतात. आम्हांला तें रोजचंच आहे म्हणून आम्हांला कांहींच वाटत नाहीं त्याचं. आजीला विचार हवं तर. "

" खरं आहे तें. " सुभद्रा म्हणाली, " खरोखरच आम्हांला त्याबद्दल कांहीं वाटत नाहीं. घरीं बोलतांना आम्ही रोज हलक्या आवाजांत बोलतों, आतां शिमग्यांत मोठमोठ्यानं बोंबा मारतील. तुम्ही मोठीं माणसं ना ? तुम्हीं असलं कांहीं बोलत नाहीं. बोललांत तर एका शिमग्याच्या दिवशीं. या एका दिवशीं तो तसला शब्द उच्चारून प्रत्येकानं बोंब मारलीच पाहिजे असं शास्त्र आहे म्हणून बरं. तेवढी तरी आठवण रहाते तुम्हांला. नाहीं तर आमची रोजची भाषा कशी असते हें तुम्हां लोकांना मुळींच कळलं नसतं. "

म्हाताऱ्या सुभद्रेचे ते उद्गार ऐकून किकीच्या रागाचा पारा क्षणभर खालीं उतरला–तरीही ती धुमसत होती. तिनं तो राग माझ्यावर काढला. ती म्हणाली, "या लोकांची गोष्ट सोडून द्या पण माझा आरोप आहे तो तुमच्यावर. या वेळीं तुम्हीं धोंडशेटच्या बाजूनं उभं रहायला हवं होतं. पूर्वीचा राग असला म्हणून काय झालं ? पूर्वी या लोकांनीं तुम्हांला जेव्हां विरोध केला तेव्हां मीच नाहीं का झगडायला उठलें ? पण आतां त्यांची बाजू न्यायाची आहे–या वेळीं नको का त्यांना पाठिंबा द्यायला ? अयोग्य कामांन विरोध करायचा, तशी योग्य कामीं मदत नाहीं का करायची ? तिथं जुना डूख धरून बाजूला बसून रहाण्यांत कसला पुरुषार्थ ?"

"या वेळीं मला कांहींच उत्तर द्यायचं नाहीं." मी म्हटलं, "गांवांतल्या बहुसंख्य लोकांना विरोध करणं चांगलं नव्हे याचा अनुभव मी त्या पूर्वीच्या प्रसंगींच घेतला आहे. त्या वेळीं त्यांच्या खासगी गोष्टी चव्हाट्यावर आणून याच तरुणांवर मात करायचा तूं प्रयत्न केलास म्हणून त्यावेळीं तुझा जय झाला. खासगी गोष्टी काढून त्यांचे कान पकडले नसते, त्यांची लबाडी त्यांच्या पदरांत घातली नसती, तर नुसता वादविवाद करून त्यावेळीं त्यांना निरुत्तर करतां आलं नसतं. असंच होतं ना तें ?"

किकी क्षणभर उगीच राहिली. जनी हंसत होती. रागारागानं जनीकडे पहात ती मला म्हणाली, "ही जनीच तुम्हांला गांवढळ करते आहे. सुधारणेचा अभिमान विसरून दिवसें-दिवस तुम्ही गांवढळ बनत चाललां अहांत !—"

"या गांवातच रहायचं आहे मला." मी शांतपणें म्हटलं, "गांवढळ झाल्याशिवाय मला गांवढळांचं अंतःकरण पारखतां यायचं नाहीं."

"बरं बरं !" किकी म्हणाली, "मग गांवढळ होऊन रहा तर. या कामीं तुमचं आमचं पटायचं नाहीं." असं म्हणून ती रागारागानं निघून आपल्या खोलींत जाऊन बसली.

क्षणभर मला वाईट वाटलं. जरी मी तिला टाकून बोललों नव्हतों तरी तिच्या ठाम सम-जुतीवर मी न बोलतां आघात केला होता. मी प्रयोग करून पहात होतों—पूर्वीच्या अनुभवानं शहाणा होऊन ते प्रयोग करतांना शक्य तेवढी खबरदारी घेत होतों. उपदेशकाच्या भूमिकेवर उभं राहून खेडवळाला कांहीं सांगायचा प्रयत्न केला, तर आदरानं नमस्कार करून तो घरीं निघून जातो आणि अगदीं स्वाभाविकपणं ऐकलेला उपदेश आपोआप विसरतो, हें मी पाहिलं होतं. कीर्तनं, पुराणं भाविकपणानं ऐकून घरीं जातांच विसरण्याची जी आंधळी संवय,

अशिक्षित समजल्या जाणाऱ्या खेडवळाच्या अंगी बाणली होती ती काढून टाकायला उपदेश-काची वरिष्ठ भूमिका स्वीकारणं परिणामकारक होणार नाहीं असा माझा ठाम समज झाला होता. कुणाचंही न ऐकतां या प्रकरणीं स्वतःच्या बुद्धीनं वागायचं मी ठरवलं. सर्वांच्या विरोधाला मी सहज तोंड दिलं असतं, पण या बाबतींत मला किकीशींच विरोध करावा लागणार आहे हें पाहून माझं मन क्षणभर उदास झाल्याबांचून राहिलं नाहीं.

प्रकरण चवथें

# मी आणखी गांवढळ बनलों

मुंबईहून आलेले हे तरुण विद्यार्थी कांहींतरी विशेष कार्यक्रम आंखून आले होते. मागल्या खेपेला सहजगत्या सांपडलेली संधि साधून हिंदुधर्माच्या अभिमानाच्या नांवाखालीं त्यांनीं मला विरोध केला होता खरा पण या खेपेचा प्रचार करतांना ते हिंदुधर्मावरच कोरडे हाणीत होते. किकीला त्यांच्याबद्दल जी आपुलकी वाटली ती त्यांच्या याच धोरणामुळं.

या तरुणांत विनायक निमगांवकर हा प्रमुख असून श्रीकांत देसाई हा त्याचा मुख्य हस्तक होता. बाकीचे तिघे चौघे नुसते आपल्या गांवी आले होते म्हणून या दोघांबरोबर फिरत होते, एवढंच.

तसं पाहिलं तर विनायक हा मोठा बुद्धिवान आणि चतुरस्र विद्यार्थी होता. नुकताच तो बी. ए. झाला होता आणि लॉ कॉलेजांत जात होता. श्रीकांतानं तीन वर्षं इंटरशीं झगडा करून कॉलेज सोडून दिलं होतं. तो स्वतःला कम्युनिस्ट म्हणवीत असे. मराठी बोलण्याचा त्याला मोठा तिटकारा होता आणि म्हणूनच इंग्रजी न बोलणाऱ्या माणसाबरोबर वादविवाद करायचं तो टाळीत असे. निमगांवांत राहिल्यापासून किकीला इंग्रजी बोलायची संधि फारच क्वचित येत होती. जनीला खिजवण्यासाठीं पहिल्या पहिल्यानं मी तिच्याशीं इंग्रजींत बोलत असें खरा पण पुढं आपोआप ती संवय सुटली. पण हा श्रीकांत भेटल्यापासून किकीनं आपल्या इंग्रजीवरच्या प्रभुत्वाचं प्रदर्शन करायला सुरवात केली.

# मी आणखी गांवढळ बनलों

विनायक आणि श्रीकांताचा प्रचार मोठ्या धुमधडाक्यानं सुरू होता आणि किकी त्यांच्याबरोबर फिरून त्यांच्या प्रचारकार्याला मदत करीत होती. या कामीं धोंडशेटचा पाठिंबा मिळाल्यामुळं किकीलाही आवेश चढला होता.

सुरळीतपणानं चाललेले आमचे कार्यक्रम यापुढं बिघडणार कीं काय अशी भीति मला वाटूं लागली. किकीनं कांहीं केलं तरी नको म्हणायचं नाहीं असं मी ठरवलं होतं. विरोधानं ईर्षा वाढते याची मला कल्पना होती. माझं तें तटस्थ धोरण पाहून जनी अस्वस्थ होत असे.

शाळेचा वेळ सोडून किकी बहुधा विनायक श्रीकांताबरोबर फिरत असे. केव्हां केव्हां रात्रीं जेवायला यायलासुद्धां तिला उशीर होई. ती येईपर्यंत आम्ही तिची वाट पहात बसत असूं. असं असूनही मी कांहींच बोलत नाहीं असं पाहून जनी मला म्हणाली, " किकी वहावत चालली आहे असं नाहीं तुम्हांला वाटत ! "

" वाटून काय उपयोग ? ती कांहीं लहान नाहीं. आपण सारीं एकाच तोडीचीं आहोंत— निदान ती आणि मी तरी ! वडिलकी गाजवायचा मला मुळींच अधिकार नाही. बरोबरीच्या नात्यानं जें सांगायचं तें मी एकदां सांगून टाकलं आहे, यापेक्षां मी जास्त काय करणार ? पण तूं कां सांगत नाहींस तिला ? "

" मी सांगितलं असतं, " जनी म्हणाली, " पण पहिल्यापासूनच मला तिची भीति वाटते. कितीही अवसान आणलं तरी मनाची ती हळवी आहे हें मलाच एकट्याला माहित आहे: अन् त्यांतूनही माझ्या शब्दाचं वजन तिच्यावर कसं पडणार ? किती झालं तरी मी अशिक्षित ! सहज बोलूं लागलें तरी ती अलिकडे माझ्याशीं बोलतांनासुद्धां मोठमोठे इंग्रजी शब्द वापरते. त्यांचा मराठी अर्थ विचारला तर तो कांहीं तिला सांगतां येत नाहीं. म्हणून मी बोलायचंच सोडून दिलंय तिच्याशीं ! "

माझ्याइतकीच जनीही तटस्थ राहूं पहाते आहे हें पाहून मला समाधान वाटलं. कांहीं झालं तरी निषेध करायचा नाहीं असा मी निश्चय केला होता. काय चाललं आहे याची हकिकत अलिकडे किकी मला सांगत नसे; मला तें पटत नाहीं हें तिला माहित होतं. अंधश्रद्धेला माझा विरोध होता, खोटीं धार्मिक बंधनं मला आवडत नव्हतीं, किंबहुना धर्माचं अवजड ओझं झुगारून देण्याकडेसच माझी प्रवृत्ति होती हेंही ती जाणत होती. पण मी उघड विरोध करीत नाहीं म्हणून ती नाराज होती. उघड विरोध करण्याची संधि मिळाल्यामुळं स्वतःच्या उत्साहाच्या चरितार्थासाठीं त्या संधीचा ती भरपूर फायदा घेत होती.

शिमग्याचा उत्सव सुरू झाला त्यावेळीं गांवच्या सर्व लोकांनीं मला आमंत्रण दिलं. या उत्सवांत अण्णा आणि रामभाऊ हे प्रमुख पुढारी होते. त्यांच्याच जोडीनं मीही एकाद्या प्रमुख पुढाऱ्यासारखा या उत्सवांत मिरवत होतों, त्याच वेळीं किकी उत्सवाविरुद्ध जोराची चळवळ करीत होती.

आमच्यांतच उत्पन्न झालेल्याचा फाटाफुटीची शत्रुमित्रांना सारखीच जाणिव होत होती. अण्णांना जसं दुःख होत होतं तसंच दोन्ही बाजूच्या ब्राह्मणवठारांतील मंडळीला समाधान वाटत होतं. आमच्या बालेकिल्ल्याची एक तरी वीट ढांसळत असलेली पाहून आपला जय होत आहे असं त्यांना वाटूं लागलं होतं.

जनीला दुःख होत होतं तें याचंच. ती परिस्थिति तिला फारच जाणवत होती. किकीच्या वर्तनाबद्दल ती भारीच खंत घेऊन बसली होती. शिमग्याच्या उत्सवांत बायका मिसळत नव्हत्या. नाहीं तर तीदेखील आमच्याबरोबर हिरिरीनं पुढं आली असती.

मी विरोध करीत नाहीं असं पाहून अण्णांना समाधान वाटत होतं. शिमग्याच्या प्रत्येक कार्यक्रमांत मी भाग घेत होतों. रोज जाखड्या निघत होत्या. त्या जाखड्यांत गांवच्या लोकांबरोबर हातांत रुमाल घेऊन मीही नाचत असलेला पाहून सर्वांना माझ्याबद्दल जशी सहानुभूति वाटूं लागली होती तसाच किकीला माझा राग येऊं लागला होता.

त्या दिवशीं किकी मला म्हणाली, " शिमग्याच्या या बीभत्स उत्सवांत तरी तुम्हीं भाग घेणार नाहीं असं मला वाटत होतं. कसलींतरी अर्थशून्य गाणीं म्हणत निर्लज्जपणानं रस्त्यांत फेर धरून नाचणाऱ्या कुणबटांच्या जोडीनं तुम्हींसुद्धां कसे नाचूं लागलांत ? कशी लाज वाटत नाहीं तुम्हांला ! शिक्षणाचा कांहींच संस्कार शिल्लक राहिला नाहीं का तुमच्या आंगीं ! काल तुम्हीं जाखडींत नाचत होतां अन् त्याचवेळीं मी रस्त्यानं जात होतें. विनायकानं गुपनं तुमच्याकडे बोट दाखवून माझ्याकडे पाहिलं तेव्हां मला मरणप्राय दुःख झालं. हा काय वेडेपणा चालवलाय तुम्ही ? "

मी हसलों आणि म्हटलं, " दोन प्रकारचे अभिमान माझ्या हृदयांत सळसळत होते. पहिला अभिमान जन्मजात ब्राह्मण्याचा अन् दुसरा अभिमान युनिव्हर्सिटींतून मिळालेल्या ब्राह्मण्याचा. या दोन अभिमानांच्या कैफानं आजवर मी या खेड्यांतल्या लोकांकडे पहात होतों. त्या श्रेष्ठत्वाच्या दृष्टीमुळं त्यांची सहानुभूति वाटायच्या ऐवजीं मला त्यांची कींव येत होती.

कींव येण्याइतकी वरिष्टपणाची जाणीव जागी झाल्यामुळं माझा अधःपात होतो आहे असं मला वाटलं म्हणूनच हे दोन्ही अभिमान झाडून जाण्यासाठीं मी आज निमगांवच्या जाखडींत नाचतों आहें ! ”

माझं तें भाषण ऐकून किकी तुच्छतेनं हंसली आणि म्हणाली, “ हें नवं तत्त्वज्ञान माझ्या-समोर मांडताहांत वाटतं ? अभिमान ब्राह्मण्याचाच असेल तर धोंडशेट कां आमच्या बाजूला आले ? ते कांहीं ब्राह्मण नाहींत–भंडारी आहेत— ”

“ धोंडशेट ‘ भंडारी ’ नाहींत. धोंडशेट ‘ आर्यसमाजी ’ आहेत. भंडारीपणा टाकून त्यांनीं होमहवनाला जी सुरवात केली आहे ती भंडाऱ्याला ब्राह्मणाच्या वरच्या दर्जाला आणण्या-साठीं. त्यांच्या समाजाच्या तत्त्वाप्रमाणें सारेच उच्चवर्णीय आहेत—कुणीच अधोवर्णीय नाहींत. सारेच वैदिक आहेत—पण माझा अनुभव निराळा आहे. मोठी संख्या आहे ती अधो-वर्णीयांची. त्या कनिष्ठ लोकांना ब्राह्मण करण्याचा प्रयत्न करण्यापेक्षां मूठभर ब्राह्मणांना कुणबी करणं जास्त सुलभ होईल असं मला वाटतं. कनिष्ठाला वरिष्ठ होणं कठीण जातं. त्याला निर-निराळ्या मर्यादा असतात. शैक्षणिक, जन्मजात असलेल्या स्वाभाविक, आर्थिक आणि राजकीय मर्यादेमुळं कनिष्ठाला वरिष्ठ होतां येत नाहीं. पण साऱ्या मर्यादा झुगारून बहुसंख्य कनिष्ठांच्या पायरीला येणं वरिष्ठाला सुलभ आहे हें तुलासुद्धां कबूल करावं लागेल. तूंच नाहीं का आपलं घर टाकून या कुणब्याच्या संसारांत येऊन पडलीस ? जनीची किकी करणं कठीण आहे पण किकीची जनी होणं अगदीं सोपं आहे, असं नाहीं तुला वाटत ? ब्राह्मणाचे कुणबी कसे करावे याच्याच विचारांत मी आहें. आणि त्या प्रयत्नाची पहिली पायरी म्हणून मी जाखडींत स्वतः नाचतों आहें. ”

किकी क्षणभर उगीच राहिली आणि नंतर म्हणाली, “ठीक आहे. तुमच्या मार्गानं तुम्ही चला, माझ्या मार्गानं मी जातें. तुमच्या म्हणण्यांत तथ्य नाहीं असं मी कांहीं म्हणत नाहीं, तरीही मला वाटतं, कीं तुम्हीं म्हणतां त्याप्रमाणं ही तुमची अधोगतीच आहे—” किकी पुन्हां क्षणभर स्तब्ध राहिली आणि म्हणाली, “ मलासुद्धां प्रश्न पडला आहे, वर जावं कीं खालीं उडी घ्यावी. पुन्हां मन डळमळूं लागतं. पण वाटतं, तुमचा मार्ग कुठं तरी चुकतो आहे. या खुळ्याभोळ्या लोकांच्या समजाला दुजोरा देतांना संवयीनं तुम्हीदेखील त्यांच्यासारखेच होणार नाहीं कशावरून ? ”

"बेसावधपणं मी त्यांच्यांत उडी घेत नाहीं बरं किकी !" थोडासा वडिलकीचा आव आणून मी म्हटलं, "अंतरांत मी अगदीं सावध आहें. विहिरींत बुडालेल्या माणसाला वर काढण्यासाठीं मी विहिरींत उडी घेतोंय –बुडण्यासाठीं नव्हे ! मी पोहणारा आहें या जाणिवेनंच मी ही उडी घेतोंय आणि ती जाणीव जोंपर्यंत जागी आहे तोंपर्यंत मला अधोगतीची मुळींच भीति वाटत नाहीं."

त्यावर किकी कांहींच बोलली नाहीं. माझा मुद्दा तिला पटला असावा; पण आवडत्या तत्त्वाच्या अभिमानानं ती आपला हट्ट सोडीत नसावी असं मला वाटलं. जनी मात्र मुकाट्यानं हें सारं भाषण ऐकत होती. आम्हीं बोलत असतांना तिनं मधें तोंड घालायचा प्रयत्न केला नाहीं. किकी कांहीं बोलत नाहीं असं पाहून मी जनीला विचारलं, "तुला काय वाटतं जने ?"

"मला काय वाटायचं !" जनी म्हणाली. "तुमच्या या देवाधर्माच्या उचापती मला नको आहेत. गरीबांना घासभर अन्न कसं मिळेल याच्याकडे लक्ष आहे माझं. पोटभर खायला असलं कीं या सार्‍या उचापती आठवतात –"

"चुकतेस जने–" किकी म्हणाली, "आज शिमग्यासाठीं जो पैसा खर्च केला जातोय तो कुणाचा आहे ?"

"कुणाचा आहे असं तुला वाटतं ?" जनीनं चिडून विचारलं, "गरीबांच्या वर्गण्यांनीं का हे उत्सव होत असतात ? तेवढे गरीब नाचायला येतात; पण ते त्यांना नाचवायला तुम्हीं आहांत म्हणून. पदरचे पैसे खर्च करून धर्माच्या नांवाखालीं तुम्हीं त्यांना असे नाचवतां, ते पुढं बारा महिने त्यांना फुकट राबवून घ्यायचं असतं म्हणून. उत्सव म्हटला कीं लोक धांवतात. गरीबांना वाटत असतं, सर्वांनीं केव्हांतरी एकदां एका जागीं जमावं—अशा रीतीनं तुम्हीं सावकार लोक त्यांना जमवून नाचवतां ! त्यांना वाटतं सावकरांचे हे उपकार झाले आप-ल्यावर ! सावकारांच्या कृपेशिवाय आपला धर्म रहायचा नाहीं असं समजून ते नाचतात— म्हणूनच मी म्हणतें, कीं आधीं त्यांना पोटाला खायला मिळूं दे. घांसभर तुकडा हक्कानं मिळाला कीं आपोआप त्यांचे डोळे उघडतील."

जनीचं तें भाषण ऐकून मी आश्चर्यचकित झालों. या एवढ्याशा कुणब्याच्या पोरीला एवढी खोल दृष्टि आली कुठून ? दरिद्री पुष्कळच होते. पण त्यांना हें जाणवत नव्हतं— हिलाच कां जाणवलं ?

तुच्छतेनं हंसून किकी म्हणाली, " आपलं एकच तुणतुणं तूं वाजवतेस झालं. धर्माचा प्रश्न आणि पोटापाण्याचा प्रश्न, हे दोन प्रश्न अगदीं वेगळे आहेत—"

" मुळींच नाहीं. " जनी म्हणाली, " धर्माच्या मार्गं लोक कशाला लागतात ? देवा माझं बरं कर, मला अन्न वस्त्र दे, माझ्या पोरांबाळांना सुखी ठेव, माझं घरदार शाबूत राहूं दे, असे नवस करण्यासाठींच ना हा धर्म ? देवापुढं नाचतात ते देवानं आपलं बरं करावं म्हणूनच ना ?—"

मला वेदांतील ऋचांची आठवण झाली. नुकत्याच ऋग्वेदांतल्या ऋचा मी धोंडशेटकडच्या पुस्तकांतूनच वाचल्या होत्या. त्यांत हीच मागणी केली नव्हती का ?—माझीं शेतं फोफावून येऊं देत, माझीं गोधनं वाढूं दे, रोगराई नाहींशी होऊं दे. मला वाटलं, वैदिक प्रार्थनेचं भाबडं स्वरूपच देवाच्या नवसांत दिसून येत आहे का ?

" तरीही चुकते आहेस जने. " किकी म्हणाली, " दुःख नाहींसं करण्यासाठीं म्हणूनच कांहीं माणूस देवाकडे धांव घेत नाहीं; सुखासमाधानाच्या काळांतसुद्धां देवाची आराधना करतो ती कशासाठीं ? "

" आपलं सुख टिकावं म्हणून ! " जनी म्हणाली, " दुःखाच्या वेळीं दुःख नाहींसं व्हावं म्हणून आम्हीं देवाला आळवतों अन् सुखाच्या वेळीं सुख नाहींसं होऊं नये म्हणून आळवीत असतों, एकूण एकच. हा पोटापाण्याचा प्रश्न आहे. पोटभर मिळालं, कीं कधीं कोण देवाची आठवण करतो ?—हं ! हं, थांब, तूं काय म्हणणार तें समजलं मला. सुखी माणसंसुद्धां देवपूजा करीत बसतात खरीं, पण ती नुसती लबाडी आहे. गरिबांचे गळे कापणारा माणूस आपण मोठा सज्जन आहे असं ठरवण्यासाठीं ' देवदेव ' करीत असतो. तें वाघानं पांघरलेलं मेंढ्याचं कातडं असतं. यापेक्षां दुसरं कांहीं नाहीं. "

मला आश्चर्य वाटलं. आम्हीं पोपटासारखे बोलत होतों पण तीं आमचींच भाषणं ऐकून जनी त्याच्यावर विचार करीत होती. आमच्याच भाषेनं आम्हांला उत्तरं देत होती. प्रत्येक कुणब्याला असंच वाटत असेल का ? मनांत आलं तरी बोलून दाखवतां येत नाहीं—बोलायची भाषा अवगत नाहीं—म्हणून तो मुकाट्यानं रहात असेल का ?

मी किकीला म्हटलं, "या वादांत कांहीं अर्थ नाहीं. सक्तीनं कुणी कुणाचीं मतं दुसऱ्यावर लादूं नयेत. श्रद्धा पाहिजे, पण अंधश्रद्धा नको. बुद्धीला पटलं पाहिजे—अनुभवाच्या चटक्यानं

बुद्धी जागी झाली पाहिजे. तोंपर्यंत केलेली सारी चर्चा, सारा उपदेश निष्फळ होत असतो. तुला वाटतं तें तूं कर, मला वाटतं त्याप्रमाणं मला वागूं दे. मी तुला अडथळा करीत नाहीं अन् तूंही माझ्या आड येऊं नकोस."

"जशी तुमची मर्जी." असं म्हणून किकी स्वस्थ राहिली. माझं बोलणं तिला पटत नव्हतं. या उत्सवांत मी जातीनं भाग घेत असल्यामुळं माझी अधोगती होते आहे असं तिला अंतःकरणपूर्वक वाटत होतं. माझ्या कार्याची हानी होऊं नये या प्रामाणिक इच्छेनंच ती मला या प्रकारापासून परावृत करण्याचा प्रयत्न करीत होती. तिच्या सदिच्छेबद्दल मलाही शंका नव्हती. म्हणूनच मी तिचं मन दुखवलं नाहीं. वादविवादानं विरोध वाढतो, तेजस्वी माणसं विरोधामुळं हट्टाला पेटतात, याची पूर्ण कल्पना असल्यामुळंच मी किकीपुढं नमतं घेतलं.

तिला तें जाणवलं असावं. ती म्हणाली, "मला वाटतं, अलिकडे माझ्यापेक्षां तुम्हांला जनीचंच म्हणणं जास्त पटतं. वाद घालीत बसायची तुम्हांला संवय नाहीं हें मला माहित आहे—वाद घालीत बसणं मला आवडतं हेंही तुम्हांला माहित आहे. पण माझं तोंड बंद करण्यासाठीं जनीला पुढं करून तुम्हीं स्वस्थ बसतां—"

"थांब, थांब," मी म्हटलं, "असा गैरसमज करून घेऊं नकोस. किती झालं तरी आपण शहरी माणसं आहोंत. तूं इथली खरी, तुझं लहानपण या खेड्यांतच गेलं, पण त्यावेळीं तूं अजाण होतीस. कळूं लागलं तेव्हांपासून तूं मुंबईला आहेस.—पहिल्यापासून शहरांत रहाणारा मी, अन् बुद्धीची वाढ होतांना शहरांत आलेली तूं, हीं दोघंही सारखींच ! या खेड्यांतल्या कांच्याकुच्यांत वावरणाऱ्या जनीलाच खांचखळगे कुठं आहेत तें चांगलं माहित आहे. आम्हांला वाट दाखवायचा अधिकार जनीचा आहे—सुभद्रेचा आहे. खेडेगांवांत रहाणारे असले तरी जन्मजात मोठेपणाच्या आणि सावकारीच्या जाणिवेनं बाबीकाका जसे या खेड्याला परके आहेत तसेच आम्हीही आहोंत—फक्त दोघांची भूमिका निराळी. आमचं अज्ञान जसं आड येतं तसाच बाबीकाकांचा खोटा अभिमान आड येतो आहे, एवढंच !"

"ठीक आहे." किकी म्हणाली, "तुमचं अज्ञान घेऊन तुम्हीं बसा, काकांचा अभिमान सर्वांना जाणवतोच आहे; आतां मला काय करतां येतं तेंच मी पहातें. माझ्या डोळ्यांनीं मी पहाणार—मला जनीचं गुरुत्व नको आहे."

किकीचं तें भाषण ऐकून जनी आपल्याशींच हंसली.—मलाही वाईट वाटलं—वाईट वाटलं म्हणण्यापेक्षां माझ्या मनांत एक नवाच संशय निर्माण झाला. किकीला जनीचा मत्सर

वाटतो आहे का? कां असा मत्सर वाटावा तिला? मीच आहें का त्याचं कारण? जनी हंसली ती किकीवर आपण जय मिळवला म्हणून का?—जनीच्या बाजूनं मी भांडलों तो किकीपेक्षां जनीबद्दल मला जास्त आपुलकी वाटते असं तिला वाटलं म्हणूनच का? म्हणूनच का ती हंसली?

जनीचं तें हसणं मोठं अर्थपूर्ण होतं. किकीनं त्यावेळीं तिच्याकडे पाहिलं असतं तर तिला जनीची चीड आली असती इतक्या खंवचटपणानं ती हसली होती. तें पाहून मला बरं वाटलं नाहीं. जनीच्या अंतरंगाचा ठाव अजून मला लागला नव्हता. जनी माझ्या जातीची नव्हती—जातीची म्हणजे वर्णाश्रमाच्या जातीची नव्हे, तर व्यावहारिक जातीची. मी आणि किकी ज्या संस्कृतींत वाढलों होतों तिच्यापेक्षां जनी अगदीं वेगळ्या संस्कृतींत आणि वेगळ्या परिस्थितींत लहानाची मोठी झाली होती. तिची नजर स्वाभाविक होती. आमची नजर विशिष्ट प्रकारच्या शिक्षणानं ठाकूनठोकून तयार केलेली, अर्थात बनावट होती. म्हणूनच जनीचं म्हणणं मला ग्राह्य वाटत होतं, याचा विचार किकीनं केला नव्हता.

दिवसेंदिवस मला दिसून येऊं लागलं, कीं किकी जनीच्या लोभापासून दूरावत होती.

## प्रकरण पांचवें

# मी ढोल बडवला

शिमग्याचा उत्सव जोरांत आला होता. रोज आट्यापाट्याचे सामने सारखे सुरू होते. जाखड्यांचे ताफे फेरा धरीत रोज गांवच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत हिंडत होते. रोमटं दारोदार फिरत होतीं आणि तळावर देवाचा मांड भरला होता त्या ठिकाणीं तमाशे सुरू होते. त्या दिवशीं पहिल्यानंच मी तमाशा पाहिला. कला आणि अश्लीलपणा या दोहोंचा सुंदर मिलाफ मला त्या तमाशांत दिसून आला. कड्याच्या कडकडाटानं नाचणारीला जें स्फुरण येत होतं, बेहोष होऊन नाचतांना शृंगारिक अंगविक्षेप करण्याइतकी अंतःकरणांतील भावनेची जागृति जी त्या नाचणाऱ्या बाईच्या ठिकाणीं दिसून येत होती, ती पाहून मी आश्चर्यचकित झालों.

पहिल्यानं ती कला मला अगदीं रानटी वाटली. ठाय लयींत चाललेला तो गणिताच्या मर्यादेनं टाकलेल्या मोजक्या पावलांचा नाच नव्हता. उत्तरहिंदुस्थानी बायांचे नाच मी मुंबईला पाहिले होते. नव्या संप्रदायांतले उदयशंकरी नाचही मी पाहिले होते. त्या नाचांत मार्दव होतं, अचुकपणा होता, लयी होती, मोजक्या तालावर केलेले मर्यादित अंगविक्षेप होते, सुशिक्षितांचं अंतःकरण उल्हसित होण्याजोगी कलेची नाजुक आंखणी त्या नाचांत होती. त्या उत्तर-हिंदुस्थानी, मणिपुरी नि कथाकली नृत्यानं कलेचं सुशिक्षित स्वरूप दाखवलं जात होतं.

## मी ढोल बडवला

तमाशांतील नाचाचं स्वरूप असल्या कलात्मक दृष्टीला रानटी वाटलं असतं. पण मला वाटलं, तें स्वाभाविक होतं—मानवी होतं. त्याच्यांत अतिमानवीपणाचा रेखीवपणा नव्हता—खोटी मर्यादा नव्हती—सुसंस्कृतपणाची बनावट छटा नव्हती. जें कांहीं होतं तें अगदीं नैसर्गिक, अगदीं स्वाभाविक ! त्या कलेचं स्वरूप तयार केलेल्या बागेंतल्या—खत घालून वाढवलेल्या फुलासारखं कृत्रिम नव्हतं. अफाट जंगलांत निसर्गाच्या बळावर वाढल्यामुळं बेफाम पसरलेल्या रानफुलांच्या ताटव्याप्रमाणं उघड्या वाऱ्यावर मोकाट झळाळणाऱ्या रानफुलांच्या असंख्य हेलकाव्यांच्या एकत्रित स्वरूपाप्रमाणं त्या तमाशांतील कलेचं स्वरूप अमर्याद होतं. त्या नाचांतील पावलांचा मार नाजुक नव्हता. तें तांडव होतं—तें नृत्य नव्हतं—त्या तांडवामुळं सारी भूमि हादरून जात होती. त्या तांडवाशीं समताल असणाऱ्या अमर्याद अंगविक्षेपामुळं असंख्य प्रेक्षकांचा समाज थरारून कामुकतेचीं वीरासनं घालीत होता. त्या नाचाच्या द्वारें आणि त्या नाचाला प्रेरणा देणाऱ्या लावणींतील शब्दांच्या द्वारें कामुकतेचा जो उठाव केला जात होता तो जितका स्वाभाविक होता तितकाच विशुद्ध आणि निर्मळ स्वरूपाचा होता. तें देवांचं स्वर्गीय नृत्य नव्हतं—पराक्रमी दैत्यांचं तें निस्सीम तांडव होतं. सुसंस्कृतपणाचा त्यांत मागमूससुद्धां नव्हता. संस्कारहीन स्वाभाविकतेची ती कमाल मर्यादा होती.

तें अपूर्व दृश्य पाहून मी भान विसरलों. कामुकतेचे शब्द कानीं येत होते पण त्या शब्दांचा भावनांवर परिणाम होत नव्हता. त्या नृत्यांतील अंगविक्षेपाशीं समांतर असणारे शब्द वादळाच्या बेफाम वाऱ्याप्रमाणें चौफेर उधळले जात असतांना प्रेक्षकश्रोता बेहोष होत होता खरा, पण त्या बेहोषपणांत निसर्गाच्या नागव्या स्वरूपाची जी विलक्षण तद्रूपता होती तिचा अंदाज जाणक अंतःकरणाखेरीज इतरांना झाला नसता.

या विषयांत मी जाणता नव्हततों. अगदीं अजाणपणें मी तमाशा पहाण्यासाठीं आलों—तमाशा या नांवामागें असणारी टाकाऊपणाची सार्वत्रिक भावना मनांत असतांना आलों. पण प्रत्यक्ष तो पाहिल्यानंतर या सार्वत्रिक समजाबद्दल पुन्हां विचार करावा असं मला वाटूं लागलं.

त्या सर्व दृश्यांत अश्लीलता होती यांत शंका नाहीं. पण ती अश्लीलता जाणवत होती माझ्यासारख्या पांढरपेशाला. राधाकृष्णांचे प्रसंग मधें ' सोंगें ' या नांवाखालीं केले जात होते. त्यांत कृष्णगोपीच्या संवादांत शारीरशास्त्राचं उघडउघड विवेचन केलं जात असलं तरी

त्याचा धक्का श्रोत्यांना बसत नव्हता. एकादं कुठं अश्लील वाक्य एखाद्या पुस्तकांत आलं, कर्व्यांसारख्या एकाद्या समदृष्टी लेखकानं पौराणिक अश्लीलतेची शास्त्रोक्त चर्चा केली तर जे लोक एकदम उसळून चिडून उठतात, त्यांनीं हे तमाशे पाहिले नसावेत असं मला वाटलं. किंवा पाहिले असले तर 'खालच्या दर्जाच्या लोकांसाठीं' ही अश्लीलता असली तरी चालेल, पांढरपेशांनीं मात्र तीपासून दूर रहावं, असा त्यांचा समज होत असावा. पण 'खालच्या दर्जाचा समाज' हाच आपला बहुजनसमाज आहे, हें कदाचित या सोंवळ्या लोकांना माहित नसावं. मुठभर पांढरपेशांचे हितसंबंध राखण्यासाठीं तत्परता दाखवतांना लाखों बहुजनांची उपेक्षा केली जात आहे असं म्हणूनच मला वाटलं. ही अश्लीलता असेल, टाकाऊ असेल, त्या अश्लीतेमुळं समाजावर वाईट परिणाम होत असेल, तर तिचा त्याग करायला सर्वांनाच भाग पाडलं पाहिजे, असं हे सोंवळे लोक कां नाहीं म्हणत ?

त्या असंख्य श्रोत्यांत बसून ते तमाशे पहातांना—पहिल्यानं कांहींही वाटलं तरी नंतर—माझ्या मनावर त्या अश्लीलतेचा परिणाम झाला नाहीं.

दुसऱ्या दिवशीं मी किकीला तो माझा अनुभव सांगितला त्यावेळीं मी स्तंभित झाली. तिचा समज ऐकीव बातमीवरून झाला होता. त्या ऐकीव बातम्यांवरूनच आजवर तिनं या तमाशांकडे ढुंकूनसुद्धां पाहिलं नव्हतं—तमाशाबद्दलचा विचारसुद्धां मनांत येऊं दिला नव्हता. म्हणूनच तमाशाच्या प्रभावाचं मी वर्णन केलं त्यावेळीं तिला धक्का बसला. जनीनं तमाशे पाहिले होते—लहानपणीं चोरून पाहिले होते. तिला त्यांची कल्पना होती, पण मला तमाशे पाहून जें कांहीं वाटलं तें तिलाही वाटत नव्हतं. मी म्हटलं, "आतां एकदां माझ्या डोळ्यांनीं तुम्ही हे तमाशे पहा. प्रचाराचं माध्यम म्हणून मला त्यांचं फार मोठं महत्त्व वाटतं. कलेच्या दृष्टीनं पाहिलं तरीही, एक संस्कारहीन स्वाभाविक कला त्यांत आहे. त्या कलेंत पांढरपेशे-पणाची वृत्ती नाहीं—स्वाभाविकता आहे--कुणबाऊपणा आहे–तो कुणबाऊपणाच मला फार आवडला."

माझा तो उत्साह पाहून त्या दोघींनाही हंसू आलं. किकी म्हणाली, "शहरांतून माणूस खेड्यांत आला, कीं उकिरड्यांतसुद्धां सौंदर्य शोधू लागतो. त्यांतलंच हें आहे—"

"अगदीं बरोबर सांगितलंस." मी म्हटलं, "हें उकिरड्यांतलं सौंदर्यच मला शोधून काढायचं आहे. उकिरड्यांत सौंदर्य नसतं असं म्हणणाऱ्याला काळीज आणि डोळे दोन्हीही

नाहींत असं मी म्हणेन. पण तुम्हांला तें पटणार नाहीं. लोकांच्या बोलण्यावरून कांहीं तरी ठाम समज करून घेण्याऐवजीं आधीं एकदां हे तमाशे पहा."

या शिमग्याच्या प्रकरणामुळं किकीच्या मनांत थोड्याबहुत प्रमाणांत विरोधी वृत्ति जागी झाली होती. माझ्या नजरेंत कुठं तरी दोष उत्पन्न झाला आहे असं तिला वाटत होतं. माझ्या नजरेंतला हा दोष नाहींसा करण्याचा प्रयत्न करण्यासाठीं तिनं तमाशा पहायला यायचं कबूल केलं. आम्हीं दोघंही तमाशा पहायला गेलों तेव्हां जिकडे तिकडे खळबळ उडाली. मी एकटा गेलों होतों त्यावेळीं कुणाला कांहीं विशेष वाटलं नव्हतं, पण 'किकी आली' हें पाहून सर्वांनाच मोठा धक्का बसला.

तमाशा पहात असतांना आपल्या मनावर कोणत्या प्रकारचा परिणाम घडूं न देण्याची खबरदारी किकी घेत होती. श्रोत्यांना आकर्षक होणाऱ्या प्रत्येक प्रसंगाच्या वेळीं मी तिची मुद्रा निरखून पहात होतों. मनावर होणारा परिणाम चेहऱ्यावर दिसूं न देण्याची ती बुद्धिपुरस्सर खबरदारी घेत होती.

दौलतजाद्याच्या फैरी झडूं लागल्या. लोक सारख्या चवल्या फेंकूं लागले, नाचणारणींना प्रेक्षकसमुदायांत हांका मारून बोलावून घेऊन दौलतजादा करूं लागले, त्या वेळीं किकी अस्वस्थ झाली आहे असं मला दिसून आलं.

मध्यान्ह रात्र उलटून गेली तसतसा तमाशाला रंग भरूं लागला. त्या दिवशीं एक नांवाजलेली कोल्हाटीण आली होती. ती नुसती गात होती. नाचण्याचं काम दुसऱ्या दोघी करीत होत्या. त्या कोल्हाटणीनं ज्या लावण्या म्हणायला सुरवात केली त्या ऐकून मी चकित झालों. त्या लावण्या भक्तिपर होत्या—वेदान्तपर होत्या. काव्यांतील सर्व प्रकारच्या रसांचा आणि अलंकारांचा प्रकर्ष त्या लावण्यांतून उजळून दिसत होता. शब्दमाधुर्याची त्या काव्यांत कमाल झालेली दिसून येत होती.

कोण हा कवि ! मराठी भाषेच्या ग्राम्य सौंदर्याचा असाधारण उत्कर्ष दाखवणारा हा शब्दसृष्टीचा ईश्वर कोण ?

क्षणभर त्या कोल्हाटणीनं विश्रांति घेतली आणि एक म्हातारा लावण्या म्हणूं लागला. तो म्हातारा मृत्यूच्या सीमेवर उभा राहिलेला दिसत होता. त्याचे सारे केंस पिकले होते. त्याच्या तोंडांतलं दातांचं ठाणं उठलं होतं, त्यामुळं त्याचे शब्द बोबडे येत होते. टिपेला आवाज नेतांना जरी तो मुळींच फाटत नव्हता तरी त्या आवाजाचं तारुण्यातलं वैभव पांगळ पडलं आहे एवढं मात्र दिसून येत होतं. तो म्हणत असलेल्या लावण्या शृंगा-

रिक होत्या. पण त्या शृंगारामागलं काव्य अत्यंत उज्ज्वल होतं. त्या काव्याची भरारी आधुनिक कवींना लाजवण्याइतकी अमर्याद होती. साध्या शब्दांतून निर्माण केलेल्या स्वराच्या झंकाराबरोबरच सूक्ष्म भावनांचं होत असलेलं मानवी आविष्करण त्या म्हाताऱ्याच्या हृद्य गायनानं उठावून दिसत होतं. गाणाऱ्या व्यक्तीचं म्हातारपण विसरून टाकण्याइतकी प्रखर स्फूर्ति त्या स्वरमाधुर्यांत होती. वार्धक्यानं केलेला तो तरुणांना प्रिय होणारा शृंगाराचा बेफाम आविष्कार ऐकून सारे श्रोते मंत्रमुग्ध झाले.

म्हाताऱ्याचं गाणं संपतांच श्रोत्यांत कल्लोळ उठला. म्हाताऱ्यावर चवल्या पावल्यांची वृष्टि झाली. या वेळीं नाचणाऱ्या बायांकडे कुणाचंच लक्ष गेलं नाहीं. स्फूर्तीचा आवेग थंडावतांच म्हातारा धापा टाकीत बाजूला जाऊन बसला तरीही त्याच्यावर चवल्या पावल्यांची वृष्टि होत होती.

मी किकीकडे पाहिलं—त्या दृश्याचा परिणाम तिच्या मनावर झाला होता असं मला वाटलं. तो परिणाम तात्कालिक होता खरा, पण तो चिरस्थाई होईल कीं नाहीं याची मला शंका होती. एकाच बैठकींत अनादिकालापासून चालत आलेले संस्कार नाहींसे व्हावे अशी माझीही अपेक्षा नव्हती. या बाबतींत माझ्या मनावर कसलेच संस्कार नव्हते. मुंबईत असतांना तमाशाबद्दल जरी मी ऐकत होतों तरी या विशिष्ट प्रकाराबद्दलचा तीव्र तिटकारा उत्पन्न होण्याइतकी कठोर निंदाही माझ्या कानीं आली नव्हती. किकीचं तसं नव्हतं. खेड्यां-तले पांढरपेशे जरी हे तमाशे पहायला जात, तरी आपण ते पहायला गेलों होतां हें कबूल करायला तयार नसत. उघडपणें हे तमाशे पहाणं त्यांना भाग होतं. मानकरी या नात्यानं ते प्रेक्षकांच्या अग्रभागीं बसत होते. दौलतजादा करीत होते. तरीही या बाबतींत आपण नुसतं मानकऱ्याचं कर्तव्य बजावतों आहों असं दाखवायचा प्रयत्न करून, तमाशे चालत असतांना बेफाम खूष होणाऱ्या या व्यक्ति, घरीं येतांच तमाशाची निंदा करीत होत्या. ती निंदा किकीच्या कानीं आली होती. अगदीं पहिल्यापासून निंदाच तेवढी ऐकल्यामुळं तिच्या मनावर एक विशेष परिणाम झाला होता. आणि म्हणूनच पहिल्यानंच तमाशा पाहिल्यावर तिला आपलं मन बनवतां आलं नसतं असं मला वाटलं.

आम्हीं घरीं आलों त्यावेळीं कुणीच चर्चा केली नाहीं. जनीसुद्धां तमाशाला गेली होती असं घरीं येतांच आम्हांला कळलं. मी म्हटलं, “ आमच्याबरोबरच कां नाहीं आलीस जने ? ”

खंवचटपणानं हंसून ती म्हणाली, "तुम्हीं मोठीं माणसं—मानकरी लोक—त्यांतून वडे गुरुजी—अन् ही गुरुजीण—मी आपली एक मोलकरीण—या गांवच्या घोळक्यांत तुमच्यासारख्या मोठ्या माणसांबरोबर जर मी गेलें तर उद्यां माझ्या तोलाचीं माणसं मला जवळ करणार नाहींत. मोलकरणीनं मोलकरणीच्याच पायरीनं राहिलं पाहिजे. मी तुमच्या-बरोबर गेलें असतें तर आपली पायरी सोडून मोठ्या माणसांत घुसण्याचा मी प्रयत्न करतें आहें, असा समज करून घेऊन माझ्या माणसांनीं मला दूर टाकलं असतं—कदाचित भलता संशय सुद्धां घेतला असता. तमाशा आहे ना तो ? तमाशांत पुरुषांवरोबर कुठलीच बायको कधीं जायची नाहीं—लग्नाची बायकोसुद्धां जायची नाहीं. धर्मकार्य आहे तें, म्हणून बायका सुद्धां जातात–पण त्या आपल्या बायकांबरोबर बसतात. कीर्तनाला तरी कुठं बायका पुरुष बरोबर जातात ? तिथं देखिल बायकांची जागा निराळीच नसते का ? तिथं ब्राह्मण बायकांची जागा निराळी अन् इतरांची निराळी–पुरुषाच्या आजुबाजूला सुद्धां बसतां येत नाहीं तिथं, मग तमाशांत पुरुषांबरोबर बायका कशा जातील ? तुम्हीं दोघं गेलांत म्हणून तुमचीसुद्धा छी थू झाली असती. पण आतां लोक तुमच्याकडे वेगळ्या नजरेनं पहातात. तमाशे कसे असतात हें पहायला म्हणून तुम्हीं आलांत असंच सारे लोक म्हणत होते. तुम्ही खरे तमासगिर असतां तर दौलतजादा नसना का केला ? बाबीकाका किती चवल्या फेकीत होते तें पाहिलंत ना ? केवढा बोलबाला होत होता त्यांचा ! मानकऱ्याच्या नांवाला शोभण्यासारखं कांहीं केलं पाहिजे ना ? बघे म्हणून तुम्ही गेलांत म्हणूनच कुणी कांहीं बोललं नाहीं"

बाबीकाका दौलतजादा करीत होते हें जरी माझ्या ध्यानीं आलं नव्हतं तरी किंकीनं तें पाहिलं होतं. ती म्हणाली, "काका दौलतजादा करतील असं नव्हतं मला वाटलं ! दौलतजादा करणाऱ्यांना काका कशीं नांवं ठेवीत हें मी जन्मभर ऐकत आलें होतें. पहिल्यानं माझा माझ्या डोळ्यांवर विश्वास बसेना —"

"मी दरसाल पहातें आहें," जनी म्हणाली, "त्यांत कांहीं नवीन नाहीं अन् त्यांत कांहीं दोषही नाहीं. गांवचे मानकरी आहेत ना ते ? गांवात आलेल्या तमाशेवाल्यांना चार पैसे त्यांनीं द्यायचे नाहींत तर द्यायचे कुणीं ? सर्वांच्यापेक्षां जास्त वेळ दौलतजादा केला नाहीं तर गांवातल्या कुणापेक्षांही ते कसे मोठे ठरतील ? संध्याकाळीं त्यानीं कुणाच्या दुकानावरून किती रुपयांच्या चवल्या करून घेतल्या होत्या याची बातमी मला लागली होती–"

"हें बरं नव्हे जने !" मी म्हटलं, "असले गांवढळ उपद्व्याप करायचं आतां यापुढं तरी सोडून दे. या गांवच्या उचापती तुला कशाला ?"

मोठमोठ्यानं हंसत जनी म्हणाली, " तुम्हीं आतां आलांत ! पण जन्मभर मी तेंच करीत आलें आहें ना ? मी गांवढळ आहें आणि तुम्हीं मला कितीही शिकवलंत तरी मी गांवढळच रहाणार आहें. मोठा अभिमान आहे मला या गांवढळपणाचा ! तुम्हीं गांवढळ नाहीं—गांवढळ कसे असतात तें तुम्हांला माहित नाहीं अन् गांवढळांना शिकवायचा आव आणताहांत ! आतां थोडे धडे घ्या माझ्याकडून ! " असं म्हणून जनी निघून गेली.

आंतरिक वात्सल्यानं हंसत किकी म्हणाली, " जनी म्हणते तें खोटं नाहीं. आमच्या नजरेंत कांहींतरी दोष आहे खरा. मला तमाशा पाहायला आज नेलंत तें फार बरं झालं. मी नकळत दोष ठेवीत होतें. पुन्हां एकवेळ गेलं पाहिजे या तमाशाला ! "

" खरंच ? " मी म्हटलं, " तुला तमाशा आवडला ? "

" आवडला असं कसं म्हणूं " ? किकी म्हणाली, "पण या वाङ्मयाचा मला परिचय नव्हता. हें काव्य मी कधीं ऐकलं नव्हतं. सोंवळीं काव्यं मला माहित होतीं. पण या ओवळ्या काव्याची झळाळी आज मी पहिल्यानंच पाहिली. पुन्हां एकदां पाहिला पाहिजे हा तमाशा ! " असं म्हणून तीही निघून गेली.

तमाशा पुन्हां पाहिला पाहिजे, असं किकीला वाटलं याचाच मला आनंद झाला. त्या दिवशीं मला समाधानाची झोंप आली.

## प्रकरण सहावें

# मी पुन्हां ढोल घेतला

"**ही** गंमत कळली का?" जनी म्हणाली, "किकीचा कालचा बेत बदलला! तो कोण विनायक आहे ना, त्यानं म्हणे तिची कानउघाडणी केली!"

"बरं झालं," मी म्हटलं, "असं बांधून कुत्रं पारधीला नेऊन काय होणार?"

मी असं म्हटलं खरं पण तें ऐकून मला वाईट वाटलं होतं. किकीनं मला न सांगतां जनीकडेसच नुसता त्या गोष्टीचा उल्लेख कां करावा? मला सांगायला तिला धीर झाला नाहीं, कीं पुन्हां मी वादविवाद घालीन अशी तिला भीति वाटली?

कुणाच्या मतामताची फारशी पर्वा करायची नाहीं असं मी ठरवलं होतं. पण अशी पर्वा न करणं म्हणजे त्या व्यक्तीला विरोध करणं, असा माझा उद्देश नव्हता. आपल्याबरोबर कुणी आलं–सुखासमाधानानं आलं–तर त्याला बरोबर घ्यायचं, मुद्दाम कुणाला आग्रह करायचा नाहीं कीं सक्ती करायची नाहीं, कुणाची जोड मिळाली नाहीं तर स्वतःलाच जेवढं साधेल तेवढंच करायचं असा माझा बाणा होता.

त्या दोन दिवसांत किकी शक्य तोंवर मला टाळीत होती. मी मुद्दाम तिला कांहीं विचारलं नाहीं कीं येण्याबद्दल हांकसुद्धां मारली नाहीं. माझा मी जात होतों—कदाचित

जनीही जात असावी. जें कांहीं पहायचं तें पहात होतों, येतील त्या कल्पना सांठवीत होतों आणि त्यांचा उपयोग कसा करून घ्यायचा याजवर विचार करीत होतों.

त्या तमाशाच्या ताफ्याचा जो म्हातारा म्होरक्या होता त्याची मी भेट घेतली. जुन्या काळांतल्या तमाशांच्या अमदानीच्या हकीकती सांगतांना त्याचा कंठ भरून येत होता. गझलकवालीच्या आक्रमणामुळं तमाशांत होत असलेली अस्सल लावण्यांची आबाळ पाहून त्याचा जीव तिळतिळ तुटत होता. तो म्हणाला, "लावणी हें आमचं मराठ्यांचं गाणं—तें आतां नाहींसं होत चाललं आहे. म्हणायची ताकदच नाहीं कुणाला. गेल्या चार दोन दिवसांत जें कांहीं तुम्हांला ऐकायला मिळालं तेवढंच आतां राहिलं आहे. मीच एक राहिलोंय आतां, अन् हट्टानं मी माझी जुनी अमदानी चालवली आहे. त्यामुळं मला गिऱ्हाइकी नाहीं. उपाशी मरावं लागलं तरी बेहेत्तर पण आपलं मूळ सोडायचं नाहीं या अभिमानामुळं खरोखरच मला उपाशीं मरावं लागतंय. पुणंसोलापुरांत आमची खरी गिऱ्हाइकी पण तिथं आम्हांला आतां कुणींच उभे करीत नाहीं. मुंबईचं तर नांव घ्यायला नको. खेड्यापाड्यांत जुन्या जमान्यांतलीं माणसं आहेत म्हणून तीं आमचं ऐकून घेतात. आतां परवांच तुम्हीं ऐकलं असेल, रामजोशाची लावणी म्हणणारी ही आतां एकच राहिलीय—"

"कुठली रामजोशाची लावणी ?" मी विचारलं.

"अगदीं सोंवळी लावणी—भक्तिरसाची—ती म्हणत होती ती ऐकलीत ना ? स्वतः मोठी भाविक आहे ती बाई. मोठी कृष्णभक्त आहे. रामजोशाच्या लावणीखेरीज दुसरी कुठलीच लावणी ती कधीं म्हणत नाहीं. शिणगाराशिवाय तर चालत नाहीं तेव्हां असा हा देवादिकांचा शिणगार आळवावा लागतो. अजून महारी लावण्या तुम्हीं ऐकल्या नाहींत. त्या म्हणणारीं माणसंही आतां राहिलीं नाहींत—"

"कोण आहेत या गाणाऱ्या बायका ?"

"ही रामजोशाची लावणी म्हणते ती महारीण आहे. एक दोन कोल्हाटणी आहेत. आवाज ऐकलात ना त्यांचा ? ज्या पट्टींत त्या गातात त्या पट्टींत गाणारी कोण तुमची कलावंतीण असेल ती दाखवा पाहूं मला. मिळमिळीत झालंय अलिकडचं गाणं ! चांगला भरपूर दम असावा लागतो छातींत. दिवसेंदिवस तीं माणसं घटत चाललीं आहेत अन् आमचेही दिवस आतां भरत चालल्येयत. याच दोघीचौघी आहेत तोपर्यंतच माझे डोळे मिटले म्हणजे मिळवली असं वाटतंय."

# मी पुन्हां ढोल घेतला

म्हाताऱ्याचे डोळे भरून आले होते. कंठ सद्गदित झाला होता. आपल्या कलेबद्दलचा त्याचा हा निस्सीम जिव्हाळा पाहून माझ्या मनावर परिणाम झाल्यावांचून राहिला नाहीं.

मी विचारलं, " या असल्या ओंगळवाण्या लावण्या तुम्हीं कां म्हणतां ? साऱ्या रामजोश्या-च्याच कां म्हणत नाहीं ? "

तशा मनस्थितींतही त्याला हसूं आलं. तो म्हणाला, " जसं पहावं तसं दिसतं. खेडेगांवच्या नजरेंत यांत ओंगळवाणं कांहींच नाहीं. हीच असते त्यांची भाषा. हीं कवनंसुद्धां त्यांच्याच भाषेंत नसलीं तर कोण पाहील आमचे हे तमाशे ? तुम्हींच पाहिलं ना कसे लोक रंगून जात होते ? तीच हौशी म्हणूं लागली रामजोशाच्या लावण्या, तेव्हां सारे थंडावले. ऐकत होते पण उसळत नव्हते. बरं वाटतं तें तसलं गाणं ऐकून, पण तमाशा बघितल्यासारखा वाटत नाहीं, त्यामुळं आपली चूप म्हणून ठेवली आहे झालं. "

मला रामजोशाची कांहींच माहिती नव्हती. त्या म्हाताऱ्यालासुद्धां लावण्यापलीकडे रामजोशाचा इतिहास अवगत नव्हता. शक्य तितकं करून ही माहिती मिळवायचं मी ठरवलं.

शिमग्याचा उत्सव ऐन रंगात येत होता आणि तिकडे किकी, विनायक आणि श्रीकांत यांची शिमगाविरोधी चळवळही जोरांत येत चालली होती. विनायकाला एका काळीं पाठिंबा देणारे बाबीकाका आतां त्याच्यावर उलटले होते. धर्माच्या अभिमानानं ज्यावेळीं तो बोलत होता त्यावेळीं तें त्यांना पटत होतं पण आतांचा त्याचा शिमग्याचा विरोध बाबीकाकांना अधार्मिक वाटला म्हणूनच त्यानीं त्या लोकांना विरोध करायला सुरवात केली.

मी उत्सवांत भाग घेत होतों याचं बाबीकाकांना समाधान वाटत होतं असं मला कळून आलं. क्वचित ते माझी स्तुतिही करीत होते. पूर्वी एकदां त्यांनीं माझ्याशीं बोलणं टाकल्या-पासून पुन्हां बोलायचा प्रयत्न केव्हांच केला नव्हता. मीही त्या बाबतींत उदासीन होतों. किकीच्या समोरसुद्धां ते येत नसत. पण या उत्सवामुळं माझ्या त्यांच्या बैठकी एका जागीं होऊं लागल्या आणि त्यामुळं त्यांच्या मनांतली अढीही हळूहळू दूर होत चालली.

तो पौर्णिमेचा दिवस होता. या दिवशीं गळ्यांत ढोल बांधण्याचा महारी हक्क सर्वांनाच मिळणार होता. संध्याकाळपासून जाखड्यांना सुरवात झाली. तोंपर्यंत महार ढोल वाजवीत होते. पण रात्र पडतांच देवाच्यासमोर जयजयकार करून महारांनीं ढोल खालीं ठेवले. त्याच जयजयकारांत पहिले मानकरी या नात्यानं बाबीकाकांनीं गळ्यांत ढोल घातला. अण्णा रामभाऊप्रभृति सारे वाणीउदमी लोक गळ्यांत ढोल चढवूं लागले.

त्यांच्या अनुकरणानं मीही ढोल उचलला.

फेरे सुरू झाले. बोंबाबोंबीच्या कल्लोळांत जाखड्या नाचूं लागल्या. ढोल वाजवणं सोपं नाहीं असं मला वाटलं. ढोलाचं वजनसुद्धां भरभक्कम होतं. गळ्यांत ढोल बांधून एवढीसुद्धां तक्रार न करतां मी नाचत होतों असं पाहून गांवच्या सर्व ल्हानथोर लोकांना माझ्याबद्दल अभिमान वाटला.

दूर उभे राहून किकी, विनायक आणि श्रीकांत आमचा नाच पहात होतीं. आज त्यांना कुणाचाच पाठिंबा नव्हता. धोंडशेटनीं जरी गळ्यांत ढोल बांधला नव्हता तरी गांवचे मानकरी या नात्यानं जाखडीबरोबर त्यांना हजर रहावं लागलं होतं.

ढोलांचे आवाज, जाखडीचीं गाणीं, नाचाचा थयथयाट आणि दूरून ऐकूं येणारा शिमग्याच्या बोंबेचा आवाज यांनीं सारा गांव दणाणून गेला होता. आमच्या बरोबरची मंडळी जरी बोंबा मारीत होती तरी फांका घालीत नव्हती. त्यांचं सर्व लक्ष ढोल वाजवून नाचण्याकडे होतं. वर्षांतील तीनशेंचौसष्ट दिवस वर्ज्य असलेल्या दोन गोष्टी, ढोल वाजवणं आणि बोंब मारणं, एकच दिवस करायला मिळाल्यामुळं उभ्या वर्षाची पुरेपुर वसुली करण्यासाठीं प्रत्येकजण मोठ्या आवेशानं ढोल वाजवून नाचत होता.

पहिल्यापहिल्यानं मला तें जरा कठीण गेलें. पण एकदां ढोलांचं घुमणं सुरू झाल्याबरोबर हळूहळू मीही त्यांत रंगूं लागलों. पूर्वीपासून मला वाद्याची आवड असे. कॉलेजांत येण्यापूर्वी मी तबला वाजवायला शिकलों होतों. बरोबरच्या विद्यार्थ्यांच्या गाण्याच्या बैठकींत तबला वाजवण्याचं काम मी पुष्कळ वेळ केलं होतं. क्वचित नांवाजलेल्या एकाद्या गायकाचीही साथ करण्याची संधि मला लाभली होती. म्हणूनच त्या तालाची लय माझ्या डोक्यांत शिरतांच भान विसरून ज्यावेळीं मी रंगून वाजवीत नाचूं लागलों, त्यावेळीं अण्णा हळूच मला म्हणाले, " वा गुरुजी ! पूर्वीची संवय आहे वाटतं वाजवायची ? "

मी दचकलों आणि भानावर येऊन उत्तर दिलं, " ढोल नव्हे, तवला. "

नाचत असतांनाच आमचं बोलणं चाललं होतं. अण्णा म्हणाले, " हें ढोलाचं ओझं पेलतं का तुम्हांला ? "

" पहिल्यानं जरा जड वाटलं, पण तालाच्या रंगांत आतां ओझ्याची आठवणसुद्धां होत नाहीं. "

" मोठा नाद आहे नाहीं हा ? ढोल घुमूं लागला, कीं सारं जग विसरल्यासारखं वाटतं ! नाहीं ? "

" क्षणभर असं झालं खरं. "

" पण ढोलावरची महाराची काठी कांहीं और असते. तो नाद कांहीं आमच्या काठीला येत नाहीं. शिवाय महाराच्या मनगटांत देखील जो जोर असतो त्याची सर आमच्या काठीला यायची नाहीं. नुसती काठी बडवून चालत नाहीं. ती घांसून घुमवली पाहिजे आणि तितक्याच जोरांत डाव्या हाताची थाप पण पडली पाहिजे, तरच खरी लय साधते.—"

वेशीवर आल्यामुळं फेरा थांबला आणि उतरलेले ढोल शेकवण्यासाठीं सर्वांनीं शेकोटी पेटवली. शेकोटी दिसतांच बोंबा ठोकण्याची कळ प्रत्येकाला आली आणि आम्हीं गांवाबाहेर आलों असल्यामुळं प्रत्येकानं छाती फुगवून एकदां शंख केला. त्या समुदायांत मिसळल्यामुळं मीही केव्हां बोंब ठोकून गेलों हें माझं मलाच कळलं नाहीं.

तें ध्यानीं आलं तेव्हां मला लाज वाटली आणि त्याचवेळीं समोर नजर गेली, तों तिथंच किकी विनायकाबरोबर बोलत उभी होती. मी बोंब ठोकल्याचं तिच्या नजरेला पडलं होतं.

मी अगदीं शरमिंदा झालों. ढोल टाकून पळून जावं असं क्षणभर मला वाटलं. माझ्या अंतरंगांतला पांढरपेशा उसळून जागा झाला होता. माझे कान पकडून तो मला या समुदाया-बाहेर खेंचू लागला होता. पण—

मी आत्मसंमयन केलं. या गर्दींत मी एकदां घुसलों खरा—आतां माघार घेणं म्हणजे नामुष्की होती. सुशिक्षितपणाचा अभिमान टाकून जो मी या उत्सवांत सामील झालों होतों, त्याचा सर्वेत्रांना जो अभिमान वाटला होता, जी आपुलकी उत्पन्न झाली होती, ती आयते वेळीं पिछेहाट घेतल्यामुळं नाहींशी झाली असती. खादीच्या प्रचारासाठीं नाही का मी सर्वांच्या निंदेला तोंड दिलं ? कुणब्याच्या हातचं अन्न खाण्याच्या बावतींत ब्राह्मणांनीं केलेल्या तीव्र विरोधाला नाहीं का मी तोंड दिलं ? मग आतांच मी माघार कां घ्यावी ?

पुन्हां वाटलं, ती सुधारणा होती. ही पिछेहाट आहे. सुधारणेसाठीं दाखवलेला निधडेपणा पिछेहाटीच्या बावतींत योग्य ठरेल का ?

पण ही पिछेहाटदेखील सुधारणेसाठींच नव्हती का ? विहीरींत बुचकळत बुडायला आलेल्या माणसाला बचावण्यासाठीं विहीरींत मारलेली ही उडी होती. बुडणाऱ्या माणसा-इतकाच जरी मी बुचकळत होतों, तरी तें बुडण्यासाठीं नव्हतं—तारण्यासाठीं होतं.

ही आठवण होतांच मला पुन्हां अवसान आलं. अगदीं निर्लज्जपणानं मी ढोल तापवून गळ्यांत घातला आणि मोठ्या रंगानं ढोल वाजवीत, नाचत, माना झुलवीत, फेरा धरतांना मुद्दाम किकीच्या अंगावरून गेलों. विनायक मोठ्यानं हांसला तें मला ऐकूं आलं.

पण किकीचा चेहरा साफ पडला होता. नाचत असतांना मुद्दाम मान वळवून किकीकडे पाहून मी हांसत होतों. ती रागानं दांतओठ खात असावी असं मला वाटलं. फेऱ्याबरोबरच्या मशालीच्या प्रकाशांत तिचा चेहरा भेसूर झाल्यासारखा मला दिसला—

जाखडी अगदीं रंगात आली होती. ढोलावरची काठी एका ठेक्यांत पडत होती. झोपेंतून नुकत्याच जागा झालेल्या सिंहाच्या डरकाळीसारखे ढोल डरकाळ्या फोडीत होते--

मी अगदीं बेफाम झालों होतों—

तोंच कुणीतरी मला मागून डिंवचलं. मी मागं वळून पाहिलं. मला डिंवचण्यासाठीं जाखडीच्या फेराबरोबर फिरत किकी माझा पाठलाग करीत होती. मी सांपडतांच मला डिंवचून ती म्हणाली, " पुरे झालं आतां. द्या तो ढोल कुणाकडे तरी आणि चला घरीं. "

माझ्या अंगात वारं संचारलं होतं. मी मोठ्यानं हसलों आणि जोरजोरानं नाचून ढोल वडवूं लागलों.

दातांतल्यादातांत किकी उद्गारली, " मूर्ख, गाढव ! "

मी मागं वळून पाहिलं नाहीं. नाच अगदीं ऐन रंगांत आला होता. यावेळीं मी बाजूला झालों असतों तर मजलसीचा विरस झाला असता.

गांवाबाहेर येतांच सर्वांनीं ढोल खालीं ठेवलें. मी वळून पाहिलं तो किकी निघून गेली होती.

ठराविक झाड तोडण्यांत आलं आणि त्या झाडाची मिरवणूक निघाली. आतां जाखडीचा फेरा न धरतां झाड उचलून नेणाऱ्या लोकांच्या दोन्हीं बाजूला दोन रांगानीं उभे राहून आम्हीं ढोल वाजवीत होतां. लोक झाड खेळ्वीत होते. एवढा भला मोठा बुंधा पण तो सहज लीलेनं उचलून सर्वांनीं कित्येक कदम धांवत पुढं जावं आणि पुन्हां तसंच मागल्या पावलीं हटत कित्येक कदम मिरवणूकीबाहेर मागं जावं, अशा थाटानं आमची मिरवणूक चालली होती. आम्हीं ढोलवाले मात्र आपली जागा सोडीत नव्हतों.

मिरवणूक ग्रामदेवतेच्या देवळाजवळ येतांच पुन्हां सर्वांनी ढोल खालीं ठेवले. पूजेची तयारी सुरू झाली. खणलेल्या खड्ड्यांत झाड उभं करण्यांत आलं आणि त्याच्या आजुबाजूला लांकडं आणि शेणीं रचण्यांत आल्या. त्यातलीं बहुतेक लाकडं जरी लोकांनीं खुषीनं आणून दिलीं होतीं तरी चोरी करून लाकडं आणल्याशिवाय होळीचा उत्सव साजरा होत नाहीं असं असल्यामुळं बरीचशीं लाकडं कुणी ना कुणीतरी, कुणाच्या ना कुणाच्या तरी घरची चोरी करून, क्वचित कुणाच्या घरची नासधूससुद्धां करून आणलीं होतीं.

## मी पुन्हां ढोल घेतला

सर्व प्रकारच्या बंधनांतून मुक्त होण्याचा हा दिवस होता. आज चोरी हा गुन्हा नव्हता, शिवीगाळ हा गुन्हा नव्हता, घरफोडी हा गुन्हा नव्हता, बोंब मारणं हा गुन्हा नव्हता, शिवाशीव न पाळणं हाही आज गुन्हा नव्हता, या बंधमुक्ततेच्या परंपरेंतला हा सर्वांतला मोठा विशेष होता.

या एकाच विशेषासाठीं मी या उत्सवांत भाग घेतला होता. होळी झाल्यानंतर ढोल खालीं ठेवायचे आणि नंतर महारांनीं उचलायचे असा शिरस्ता होता. त्यावेळीं महारांना शेला-पागोटं देण्यांत येत असे. केविलवाणं तोंड करून एका बाजूस उभे राहिलेले महार जेव्हां पुन्हां ढोल उचलीत त्यावेळीं त्यांच्या मुद्रेवर एकदम तजेला चढे आणि दुप्पट आवेशानं ते ढोल वाजवूं लागत. एकदां महारानं ढोल उचलल्यावर मग अस्पृश्यतेला सुरवात होई.

इथंच मी माझ्या प्रचारकार्याला सुरवात केली. महारांनीं ज्यावेळीं ढोल उचलले त्यावेळीं मीही ढोलाला हात घातल्याचं पाहून इतरांनीं मला निवारण केलं. कुणाचंही न ऐकतां मी ढोल गळ्यांत चढवला तेव्हां आजवर माझ्याबरोबर अबोला धरलेले बाबीकाका पुढें येऊन म्हणाले, " आतां ढोलाला शिवायचं नाहीं गुरुजी. आतां ढोल महारांनीं उचलायचा. आतां ढोल उचलील तो महार ! "

" मी महारच आहें म्हणाना ! " असं म्हणून मी ढोलावर काठी हाणली.

माझा उद्देश धोंडशेटच्या ध्यानीं आला आणि यावेळपर्यंत गळ्यांत ढोल न बांधलेल्या धोंडशेटनींही एक ढोल घेऊन गळ्यांत घातला.

" हें काय ? हें काय ? " म्हणत बाबीकाका ओरडत होते. तोंच एका महाराच्या हातचा ढोल काढून घेऊन अण्णांनींही आपल्या गळ्यांत घातला. महारांच्या मेळाव्यांत मिसळून आम्हीं फेरा धरून नाचूं लागलों. बाबीकाका मोठमोठ्यानं ओरडत होते, " अरे, झालं तेवढं पुरे नाहीं का झालं ? धर्म म्हणून कांहीं आहे कीं नाहीं ? होळी लागली, शिवाशिव सुरू झाली तरीसुद्धां ढोल घालून नाचतां आहांत ! ठेवा तो ढोल खालीं धोंडशेट. अरे तुला वेड लागलं का अण्णा ?—" ओरडतांना बाबीकाकांचा घसा कोरडा पडत होता.

पूर्वीच्या कितीतरी पट रंगात येऊन आम्ही नाचत होतों. आमच्या अनुकरणानं आणखी कांहीं मंडळी महारांच्याकडून ढोल घेऊन गळ्यांत बांधून नाचूं लागली.

बाबीकाकांच्या अंगाचा भडका झाला होता. ते सारखे ओरडत होते, " अरे देवाच्या साक्षीनं भ्रष्टाकार करतां आहां ! कुठं खंडाल हें पाप ? महार देखील हंसताहेत तुम्हांला—" खरोखरच महार हंसत होते. पण ते थट्टेनं नव्हे—आनंदानं !

संतापाच्या भरांत बाबीकाका धोंडशेटच्या अंगावर धावून आले आणि त्यांनीं ढोलाला हात घातला तेव्हां धोंडशेटनीं त्यांना लोटून दिलं. बेसावध बाबीकाका पाय घसरून खालीं पडतांच एकच हंशा पिकला. रागाच्या तिरमिरीसरशीं ते कसाबसा रुमाल डोक्यावर ठेवून धांवत जाऊं लागले तेव्हां सर्वांच्या हशावर घोडं खिंकाळल्यागत कुणाचं तरी हसणं माझ्या कानीं आलं.

वळून पहातों तों जनी पोट धरधरून हंसत होती. तिच्या हंसण्याचा आवाज आजुबाजूला ठोकल्या जाणाऱ्या बोंबांच्यावर ऐकूं येत होता. ती हंसत आहे असं पाहून सारेच हसूं लागले. बोंबांचं रुपांतर हंसण्यात झालं. हंसण्याचा एकच हलकल्लोळ उठला.

ती संधि साधून मी एकदम हांक ठोकली, "स्वामी श्रद्धानंदजी की जय ! महात्मा गांधी की जय !"

एकदम हंसणं थांबलं आणि दोन्ही महात्म्यांच्या नांवाचा जयजयकार साऱ्या गांवाला दणाणून टाकूं लागला. बोंब मारण्याची सर्वत्रांना विस्मृति झाली. जयजयकारावर जयजयकार झडत होता. ढोलाचा आवाज त्याला साथ देत होता. महारांच्या हातच्या भक्कम काठीनं ढोलाचा निनाद सारं आकाश घुमवीत होता.

सारे बेफाम झाले होते, सारखे जयजयकार करीत होते आणि त्याचबरोबर स्वतःच्या सामर्थ्याकडेसुद्धां न पाहातां बेहोष होऊन नाचत होते.

चट्कन मला आठवण झाली—मी वळून मागं पाहिलं—जनीच्या शेजारी किकी उभी होती.

दोघींही श्रद्धानंद आणि गांधीजीच्या नांवानं जेव्हां जयजयकार करूं लागल्या त्यावेळीं पहायला जमलेल्या बायकांनीही त्यांच्या शब्दांत आपला शब्द मिसळला.

मला वाटलं, अस्पृश्यतेच्या अभेद्य तटबंदीतली पहिली वीट आम्हीं हालवली.

## प्रकरण सातवें

# मी वादविवाद करूं लागलों

दुसऱ्या दिवशीं गांवात मोठी खळबळ उडाली होती. बाबीकाकांनीं मोठा आरडाओरडा सुरू केला होता त्याचा कित्येक अंधश्रद्धाळू लोकांवर परिणाम झाला होता. अस्पृश्यता पाळायची नाहीं असा उभ्या वर्षांतला एकच दिवस-(किंवा एकच रात्र जरी धर्माज्ञेप्रमाणें—म्हणजे रूढीप्रमाणें)—योजून देण्यांत आला होता तरी त्या मुदतीनंतर अस्पृश्यता पाळणं, त्याच रूढीप्रमाणें अवश्य होतं. हा नियम आम्हीं मोडला म्हणूनच हा आरडाओरडा सुरू झाला होता.

या प्रकरणाचा विचार करण्यासाठीं त्या दिवशीं संध्याकाळीं बैठक भरणार होती. अर्थातच त्या बैठकींत बाबीकाकाप्रभृति विरोधी मंडळी येणार नव्हती. मी जरी गांवचा नव्हतों तरी माझ्या अनुकरणानंच गांवच्या इतर लोकांनीं हा कायदा मोडला होता. म्हणून अपराधाचा सर्व बोजा माझ्यावर ठेवण्यांत आला होता. गांवच्या पंचांच्या समोर मला उभं करण्यापूर्वी म्हणूनच ही बैठक घ्यायचं ठरलं होतं.

तसं पाहिलं तर, मला पंचासमोर उभं करण्याचा कुणालाच अधिकार नव्हता. मी निमगांवचा रहिवाशी नव्हतों. पण या प्रकरणीं कोणताच विरोध न करतां आल्या प्रसंगाला निर्भयपणानं तोंड द्यायचं मी ठरवलेलं पाहून अण्णा, धोंडशेट वगैरे मंडळींनांही समाधान वाटलं.

किकी आणि जनी या प्रकरणीं कांहींच बोलत नव्हत्या. किकीचं मतांतर झालेलं जरी मी प्रत्यक्ष पाहिलं होतं तरीही ती आपणाहून जोपर्यंत कांहीं बोलत नाहीं तोपर्यंत आपणही कांहीं बोलायचं नाहीं असं मी ठरवलं. जनी मात्र मोठ्या खुषींत होती. ती सर्वत्रांना सारख्याच शिव्या देत होती. विनायक आणि श्रीकांत यांना जनी शिव्या देत होती तरीही किकी कांहीं बोलली नाहीं.

धोंडशेटचा पाठिंबा नाहिंसा झाल्यामुळं विनायक आणि श्रीकांत अस्वस्थ झाले. त्यांतून किकीही नित्याप्रमाणं त्यांना भेटायला गेली नाहीं म्हणून त्यांचा निरोप आला. शाळेला शिमग्याची सुट्टी होती. आणखी दोन-तीन दिवस शाळा बंद रहाणार होती. त्यामुळं आम्हां दोघांनाही कांहीं काम नव्हतं. शिमग्यानिमित्त चरखे आणि मागही बंद ठेवण्यांत आले होते. अर्थात् शिमगा प्रकरणाची चर्चा करण्याखेरीज कुणाला कांहींच काम नव्हतं.

विनायकाचा निरोप आला असतांही किकी गेली नाहीं असं पाहून जनी म्हणाली, "पाहिलंत गुरुजी, हीं अशीं मतं बदलतात. कालपर्यंत आम्हांला ही शिव्या देत होती— म्हणजे माझ्यासारख्या शिव्या नव्हे—आम्हांला नांवं ठेवीत होती.—तो कोण भाई आला आहे ना, त्या भाईबरोबर मोरे जोरजोरानं व्याख्यानं देत होती. अन् आजच पहा कशी हिची दांताखिळी बसली ती!—" जनीच्या तोंडाचा सपाटा जरी सारखा सुरू झाला होता तरी किकी एक शब्दसुद्धां बोलत नव्हती. अर्थातच मीही त्या बाबतींत तोंड घातलं नाहीं.

कधीं न येणारा विनायक आमच्या बिऱ्हाडीं आलेला पाहून सर्वांनाच आश्चर्य वाटलं. शिष्टाचाराप्रमाणं जरी नमस्कारचमत्कार झाले तरी एकंदरीत त्याचा दिमाख बराच बिघडला आहे हें स्पष्ट दिसत होतं. गृहस्थधर्माला अनसरून मी त्याला बसायचा आग्रह केला पण तो तसाच उभा राहून नुसती किकीची चौकशी करूं लागला. तो रस्त्यानं नुसता जाऊं लागला तर घरांतून धांवत जाणारी किकी त्या दिवशीं कितीवेळ झाला तरी आपल्या खोलीबाहेर येईना.

मला तें आवडलं नाहीं. माझ्या दृष्टीनं तो तिचा भेकडपणा होता. मी पुन्हां आग्रह केला त्यावेळीं विनायक बैठकीवर बसला.

मी विचारलं, "कांहीं विशेष काम होतं का?"

"हें पहा मि० मराठे," विनायक कुऱ्यांत म्हणाला, "असे ओढून ताणून प्रश्न केलेले मला आवडत नाहींत. तुम्हांला सारं कांहीं माहित आहे. तुमचींआमचीं मतं पटत नाहींत—कधीं पटणार नाहींत. तुम्हां गांधीवाल्या खादाळ लोकांचे मार्ग आम्हांला पसंत नाहींत. हृदय-

पालटाच्या गोष्टी तुम्हीं बोलतां, आम्हांलादेखिल हृदयपालटच व्हायला हवा आहे, पण त्याचे तुमचे आणि आमचे मार्ग भिन्न आहेत. ज्या संस्थेचे आम्हीं घटक आहोंत त्या संस्थेला तुमचे मार्ग पसंत नाहींत—

" कोणती तुमची संस्था ?"

" माहित असतांना कशाला विचारतां ?—सरळ मार्गानं वागायचा आव तुम्हीं आणतां, मग हे वांकडे प्रश्न कां ? "

" खरंच सांगतों, मला तुमची संस्था माहित नाहीं. मी एक अभ्यासू माणूस आहें. मला अजून पुष्कळ शिकायचं आहे. जिथून जिथून कांहीं शिकायला मिळेल, तिथून तेवढंच ज्ञान संपादन करायचं असा माझा विद्यार्थ्याचा बाणा आहे—"

तुच्छतेनं हंसून विनायक म्हणाला, " गुरुजी म्हणवून घेणाऱ्या माणसानं अभ्यासूपणाचा आव आणावा अं ! जाऊंद्या, मला तुमच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. मला मिस् जोशींना भेटायचं आहे—"

" पण योगायोगानं तुम्हीं भेटलांत—" मी शांतपणें म्हटलें. " ते आतां घटकाभर आपण बोलत बसूं !"

" म्हणूनच तिला बाहेर येऊं देत नाहीं वाटतं तुम्हीं ? " विनायक रागारागानं म्हणाला.

" असं पहा विनायकराव, " मी येत असलेला राग आवरीत म्हटलं, " तुम्ही आल्यापासून मी इथंच आहें. मी कुणाला कांहीं सांगितलं नाहीं.—असं असून तुम्हीं असा आरोप माझ्या-वर करायला नको होता. मुंबईस एखाद्या हॉटेलांत चार ठिकाणचीं चार माणसं जशीं एका जागीं रहातात तशींच आम्हीं इथं राहिलों आहोंत. हें एक लहानसं बोर्डींगहाऊस आहे. या पलिकडे इथं कुणाचा कुणावर तावा नाहीं. तसं कांहीं असतं तर पहिल्यापासूनच मी मिस् जोशीनां तुमच्याबरोबर जायला नसती का बंदी केली ? शाळेच्या व्यवहारांत हेडमास्तर या नात्यानं मी शाळेपुरता अधिकार चालवूं शकेन.—पण इथं घरीं प्रत्येकाला सारखीच मोकळीक आहे. तुम्हांला वाटत असेल तर आंत जाऊन मिस् जोशींना भेटा तसा संकोच धरायचं कांहींच कारण नाहीं. "

माझं तें भाषण ऐकून विनायक क्षणभर स्तब्ध बसून राहिला. तितक्यांत किकी बाहेर आली. तिला पाहातांच तो चट्‌कन् उठून उभा राहिला आणि म्हणाला, " जरा बाहेर येतां का ? बरंच बोलायचं आहे. "

" इथंच बोला की !" असं म्हणून किकी बैठकीवर बसली असं पाहून तोही नाईलाजानं खालीं बसला. मी बाहेर जाण्यासाठीं सदरा चढवूं लागलों असं पाहून किकी म्हणाली, " कुठं निघालांत गुरुजी ? बसा ना ! इथं कांहीं खासगी बात नाहीं कीं गुप्त कटही नाहीं. "

तसाच सदरा चढवून मी उभा राहिलों असं पाहून विनायक म्हणाला, " मला वाटतं आपण बाहेरच जाऊं !"

" म्हणजे यांच्यासमोर कांहीं बोलायचं नाहीं का तुम्हांला ?" किकीनं विचारलं.

" नाहीं—तसं नाहीं. " विनायक अस्वस्थ होऊन म्हणाला " पण ती तुमची कुळवाडीण देखिल आहे ना इथं ?"

" शटअप् ! " किकी ओरडली. " हाच का तुमचा साम्यवाद ?—" असं म्हणून तिनं जनीला हांक मारली. जनी येऊन दारांत उभी रहातांच किकी म्हणाली. " ये जने, इथं बैस. आज मोठा भाग्याचा दिवस आहे. कधीं न येणारे हे विनायकराव इथं आले आहेत. आतां तुला कांहीं विचारायचं असेल ते विचार यांना—" माझ्याकडे वळून ती म्हणाली, " अन् तुम्हीं हो कुठं चाललांत यावेळीं ? या बसा इथं—" हुकुमाच्या ताबेदारासारखा मी मुकाट्यानं बसलों असं पाहून ती विनायकाला म्हणाली, " हं ! आतां बोला काय बोलायचं तें ! "

विनायक अगदींच अस्वस्थ झाला होता—मला वाटतं घाबरला होता—तरीही उसनं अवसान आणून अधिकारवाणीनं तो म्हणाला, " तुम्हीं तमाशा पहायला गेलां होतां मिस् जोशी ?"

" हो !"

" हें बरं का ?"

" काय वाईट आहे त्यांत ? तुम्ही पाहिलाय का कधीं तमाशा ? "

" नाहीं ! "

" मग ? तमाशा वाईट आहे—न पहाण्याजोगा आहे—असं तुम्हीं कशावरून ठरवलंत ?"

" सारेच लोक बोलतात—" विनायक घुटमळत बोलूं लागला, " पूर्वीपासून बोलतात, आजही बोलताहेत, जिकडे तिकडे विद्वान अविद्वान सारेच तमाशाला त्याज्य ठरवताहेत—"

" पण तुम्हीं कांहीं पाहिला नाहीं. " किकी ठासून म्हणाली, " जें स्वतः पाहिलं नाहीं त्याबद्दलच्या ऐकीव माहितीवर विसंबून राहाणं बरं का ?—" विनायक कांहीं बोलत नाहीं असं पाहून किकी पुढं म्हणाली, " आज आपल्याकडे जें रूढीचं प्रस्थ माजलं आहे तें ऐकीव माहितीवर विसंबून राहिल्यामुळं. साम्यवादी म्हणवणाऱ्या माणसांनीं तरी ऐकीव माहितीवर

विसंबून रहायला नको आहे. मी असं विचारतें, या जातीभेदाबद्दल, स्पृश्यास्पृश्यतेबद्दल तुमच्या साम्यवादांत काय सांगितलं आहे ?"

"प्रत्यक्ष जातीभेदाबद्दल नाहीं." विनायक म्हणाला, "वर्गकलहांतच या प्रश्नाचा समावेश होतो. धनिकवर्ग आणि श्रमजीवीवर्ग यांच्या संघर्षांतून—"

"थांबा, थांबा," मी म्हटलें, "या पेक्षां आपण इंग्रजींत बोलाल तर बरं होईल. ही तुमची साम्यवादी मराठी भाषा थोड्याशा डोकं खाजवण्यानं मला कळेल—पण सांगायचं आहे तें या जनीला—तिला हे वर्गकलह आणि संघर्ष कांहीं कळायचे नाहींत."

"आतां कसं सांगू ?" विनायक म्हणाला, "इंग्रजींत बोलून कांहीं हिला समजायचं नाहीं अन् आमचे मराठी शब्द आहेत ते हेच.—"

"या शब्दांखेरीज मी सांगतें—" किकी म्हणाली, "गरीब आणि श्रीमंत यांचा हा झगडा आहे. अन् या गरीबश्रीमंतांच्या झगड्यांतच तुम्हीं जातीजातींच्या झगड्यांचा समावेश करतां. असंच ना ?"

"असंच कांहीं नव्हे," विनायक म्हणाला. "'गरीब' शब्दानं 'श्रमजीवी' शब्दाचा अर्थ होत नाहीं."

"तर मग मजूर म्हणा." मी म्हटलं, "मजूर आणि मालक यांचा हा झगडा आहे. पण मजूर मालकांच्या झगड्यांत जातीजातींचा झगडा येऊं शकत नाहीं. अगदीं दरिद्री असलेला ब्राह्मण धर्माच्या आज्ञेचा जो अधिकार इतर सर्व जातींवर चालवतो, तो मालकीच्या जोरावर नव्हे कीं पैशाच्या जोरावरही नव्हे. जन्मजात मोठेपणामुळं दरिद्री माणसाला भांडवल-वाल्यापेक्षांही जास्त अधिकार गाजवण्याची जी सत्ता मिळाली आहे तिच्या बाबतींत तुमचा साम्यवाद काय सांगतो ?"

"आमचं म्हणणं असं आहे," विनायक म्हणाला, "कीं आधीं हा वर्गविग्रह—म्हणजे Class-war मिटूं द्या ! नंतर या बाकीच्या प्रश्नांचा आपल्याला विचार करतां येईल."

"तुमचं चुकतंय तें इथंच," मी म्हटलं, "आमच्या हिंदुस्थानच्या समाजरचनेंत धर्माचं महत्त्व फार मोठं आहे. त्या धर्माच्या आधारावरच जी ही सत्ता गाजवली जाते आहे—ती ही धार्मिक भांडवलशाही जोपर्यंत अस्तित्वांत आहे—तोंपर्यंत तुमचा आर्थिक प्रश्न केव्हांही मिटवतां यायचा नाहीं. दरिद्री गुलामांचं 'धर्म' हें फारच मोठं भांडवल आहे. अन् त्या भांडवला-वर मिळत असलेली सत्ता आर्थिक भांडवलापेक्षां कितीतरी पटीनं जास्त मोठी आहे. म्हणूनच,

ज्यावेळीं खेड्याचा प्रश्न घ्यायचा त्यावेळीं धार्मिक भांडवलशाहीचं उच्चाटण करायचा प्रयत्न आधीं केला पाहिजे. अन् धर्म जोंपर्यंत कायदेशीर आहे, धर्माच्या बाबतींत जोंपर्यंत सरकार हात घालूं शकत नाहीं, तोंपर्यंत तुमची ही साम्यवादाची भाषा कानाला कितीही गोड लागली तरी तिचा परिणाम बहुजनांवर होणार नाहीं !"

विनायक क्षणभर स्तब्ध बसला आणि नंतर म्हणाला, "मला वाटतं तुम्हीं कम्युनिझमचा अभ्यास केलेला नाहीं—"

"मी कम्युनिझमचा अभ्यास केलेला नाहीं." मी म्हटलं, "अन् तो करायची सध्या मला जरूरीही वाटत नाहीं. मार्क्सच्या 'कॅपिटल' पेक्षां जास्त महत्त्वाचा ग्रंथ सध्यां मी वाचतों आहें. त्याचं अध्ययन पुरं झाल्याशिवाय मला तुमच्या कम्युनिझमकडे वळायला सवड नाहीं."

"कोणता ग्रंथ तो ?" विनायक खवचटपणें म्हणाला, "गांधीगीता ?"

"नव्हे !" मी हंसून म्हटलं, "त्याहीपेक्षां मोठा ग्रंथ आहे हा ! मी हें खेड्याचं पुस्तक वाचतों आहें—मी हें खेडं वाचतों आहें—निमगांवचा अभ्यास करतों आहें मी ! हें एवढंच पुस्तक वाचणं मला मोठं कठीण जातंय. हें पुस्तक वाचतांना मला लॅबॉरेटरी एक्स्पेरिमेंट्स् करावीं लागताहेत त्यांतच माझा सारा वेळ जातो. तरीपण तुम्हीं मधूनमधून आलांत—मधून मधूनच कां, रोज आलांत अन् मला तुमच्या साम्यवादाची थोडथोडी माहिती दिलीत तर मी तुमचा फार आभारी होईन."

"पण माझ्या प्रश्नाचं काय ?" जनी म्हणाली.

"आजच त्याची काय घाई आहे ?" किकी म्हणाली. "विनायकरावांना अजून पुष्कळ सांगायचं आहे इथं ! आतां रोज येणारच आहेत ते—तेव्हां बोलूं सावकाश."

विषय तेवढाच राहिला. निरोप घेऊन विनायक निघून गेला तेव्हां जनी किकीला म्हणाली, "तूं कां मधें तोंड घातलंस ? चांगली फजिती उडवणार होतें मी त्याची !"

"असं पहा जने," किकी म्हणाली, "या शिमग्याच्या उत्सवांतून मी एक नवा धडा शिकलें आहें. माझाच गैरसमज झाला होता. पण महाराच्या ढोलावर ब्राह्मणानं काठी मारली तेव्हां माझे डोळे उघडले. इतकीं वर्षे मी हें पहात होतें पण माझ्या ध्यानीं आलं नव्हतं. बोललें असतें, पण गुरुजींना तें आवडायचं नाहीं—केवढी मोठी कामगिरी बजावली आहे त्यांनीं !—"

"हं ! हं ! पुरे कर" मी म्हटलं, "अचानक मला एक चुणुक मिळाली. तिचा प्रयोग

करून मी पाहिला. तें कांहीं विचार करून केलेलें काम नव्हे. मी अजून अंधारांत चांचपडतोंय. यावेळीं भलतंच श्रेय मला देऊं नकोस. ''

'' कसंही असो !'' किकी म्हणाली, '' पण मला नवी दृष्टि आली खरी. हें कोडं काहीं साम्यवादानं उलगडायचं नाहीं, याची मलासुद्धां खात्री पटूं लागली आहे. ''

'' अजुनही चुकतेयस—'' मी म्हटलं, '' साम्यवादांतलं अत्यंत महत्त्वाचं तत्त्व या साम्यवादी म्हणवणाऱ्यांच्या अजून लक्षांत आलेलं नाहीं. वर्गविग्रहांची भांडणं मिटवण्याचे प्रयत्न करण्यापेक्षां, साम्यवादानंच सांगितलेलं, धर्माचं उच्चाटण करायचा प्रयत्न जर यानीं आधीं केला असता तर केवढं तरी मोठं कार्य झालं असतं. आज जे साम्यवादी पुढारी आपल्या महाराष्ट्रांत आहेत ते जितके बुद्धिवान आहेत तितकेच धूर्त आहेत. बहुजनांत धर्माचं वस्तान किती जबरदस्त आहे याची त्यांना कल्पना आहे--गांधीजींइतकीच कल्पना आहे. पण बहुजनांच्या या जाणिवेकडे लक्ष देऊन धर्म टाकायच्या गोष्टी ते मुळींच बोलत नाहींत. किंबहुना धर्माच्या नांवानंच गांधीजींनीं चळवळ चालवली आहे. पण हे साम्यवादी मात्र चट्‌कन् पटणारा पैशाचा प्रश्न चर्चेला घेऊन शहरांत चळवळ करताहेत. 'शहरांत' त्या यशस्वी होताहेत—कारण शहरांतलं जीवन पैशाच्या बळावर आधारलेलं आहे. शहरांतसुद्धां धर्माचं प्राबल्य आहे खरं, पण तें खेड्याइतकं नाहीं. म्हणून हे साम्यवादी लोक आपले तंबू 'शहरांतच' ठोकून बसलेले आहेत. म्हणूनच त्यांना अजूनपर्यंत उभं राहतां आलं. खेड्याच्या प्रश्नांत अर्थशास्त्र येत नाहीं—तेवढ्या जोरानं येत नाहीं—इथं धर्माला धक्का मारला पाहिजे अन् तें काम तरी अत्यंत विकट आहे—अत्यंत नाजुक आहे. ही सर्जरी कशी करायची हेंच आतां आपण ठरवलं पाहिजे. ''

'' हेंच मला कळलं—'' किकी म्हणाली, '' अन् एवढं कळलं हें कितीतरी कळलं असं मला वाटलं. ''

जनी नुसती हंसली. मी म्हणालों, '' मोठा आनंद झाला मला हें ऐकून. आतां या पुढं आपण विनायककडून साम्यवादाचे धडे घेऊं अन् त्याला धर्मवादाचे धडे देऊं. या कामीं आमचा कार्लमार्क्स म्हणजे जनी ! ''

आम्ही दोघंही मोठ्यामोठ्यानं हंसू लागलों. जनी मात्र गंभीर झाली होती.

---

प्रकरण आठवें

# माझा खटला चालू झाला

निमगांवच्या पंचायतीसमोर गुन्हेगार म्हणून मला उभं करण्यांत आलं. या पंचांत विनायक आहे हें पहातांच मला आश्चर्य वाटलें. एकदोन कुणबी, एकदोन वाणी, भंडारी आणि दोन ब्राह्मण या कमिटींत होते. ही कमिटी वंशपरंपरा चालत आलेली असल्यामुळंच विनायक या कमिटीवर बसूं शकला होता.

प्रेक्षकांची खूपच गर्दी झाली होती, मात्र बाबीकाका कुठंच दिसत नव्हते. पांडुअण्णा, धोंडशेट प्रभृति मंडळीनां पंचांनीं जरी आमंत्रण केलें नव्हतें तरी ते आपण होऊन हजर राहिले होते आणि आरोपी या नात्यानं आपल्यालाही सामिल करून घेण्याचा त्यांनीं आग्रह धरला होता.

पंचांनां तें पटत नव्हतं—किंवा तें पटवून घ्यायचं नाहीं, असं पंचांनीं आधींपासूनच ठरवलं होतं. ही क्लृप्ति विनायकाची असावी, अशी शंका पांडुअण्णांना आली आणि त्यांत बरंच तथ्य असावं असं मलाही वाटलं.

पंचांच्या म्होरक्याचं काम विनायकानं आपल्या अंगावर घेतलं होतं. खरं पाहिलं तर तो अधिकार एका भंडाऱ्याचा होता. पण सर्वांनीच ठरवल्यावर त्या बिचाऱ्याला कांहीं बोलतां येईना.

# माझा खटला चालू झाला

एकाद्या बड्या कोर्टाच्या जज्जाचा आव आणून विनायक मला प्रश्न करूं लागला, तेव्हां मीही एकाद्या आरोपीइतक्याच विनयानं उत्तरं द्यायला सुरवात केली. पहिलीं प्रश्नोत्तरं झालीं तीं घडून आलेल्या हकिकतीचीं, पण पुढं झालेली चर्चा मात्र बरीच महत्वाची होती. विनायक मधून मधून इंग्रजी शब्द वापरूं लागे तेव्हां प्रेक्षकांतून 'मराठींत बोला' म्हणून जनी मोठ्यानं ओरडे. पुढें पुढें साऱ्याच प्रेक्षकांनीं जनीचं तें वाक्य उचललं आणि ज्या ज्या वेळीं अशी ओरड होऊं लागली त्या त्या वेळीं विनायकही घाबरून जाऊं लागला.

प्रश्नोत्तरं अशीं झालीं:—

"तुम्हीं गळ्यांत ढोल कां घातला ?"

"बाकीचे लोक घालीत होते म्हणून."

"पण बाकींचे लोक ज्यावेळीं ढोल घालीत नव्हते त्यावेळीं तुम्हीं ढोल गळ्यांत कां घातला ?"

"बाकींच्या लोकांनीं पूर्वी ढोल गळ्यांत घातला होता. पूर्वी ते ढोल वाजवीत होते. त्या क्षणापर्यंत परिस्थितींत कोणताच फरक पडला नव्हता. त्या क्षणानंतरही नव्हता. कांहीं वेळपर्यंत ढोल घालणं जर अधार्मिक ठरत नाहीं—शिवाशिव मानणं कांहीं वेळ अधार्मिक ठरत नाहीं, तर इतर वेळीं ते कां ठरावं, असं वाटूनच मी ढोल गळ्यांत घातला."

"पण तुम्हीं आचार मोडला असं नाहीं तुम्हांला वाटत ?"

"मी इथला रहिवासी नाहीं. मला इथले आचार माहित नाहींत. मी मुंबईचा रहिवासी. मुंबईला मी शिवाशीव मानीत नाहीं. आम्हीं इराण्याच्या दुकानांत चहा पितों. मुसलमानाच्या दुकानांत जेवतों. ब्राह्मणाच्या खाणावळींत जेवायला बसलों तरी आमच्या शेजारीं बसलेला माणूस महार आहे कीं धेड आहे याची पर्वा आम्हीं करीत नाहीं. तिथं शिमग्याचा सण पाळला जातो—होळी पेटवली जाते—बोंबा मारल्या जातात. पण तिथं कुणि ढोलही वाजवीत नाहींत कीं शिवाशिवही पाळीत नाहींत. त्या जुन्या अनुभवाला अनुसरूनच मी ढोल गळ्यांत घातला."

"तुमचे अनुमान तुमच्याकडे. पण गांवच्या रिवाजाकडे तुम्हीं पहायला नको का ?"

"गांवचे रिवाज गांवच्या लोकांनीं पहायचे, मी माझ्या मनाप्रमाणें वागलों. माझ्या मताप्रमाणें वागायला मी कुणाला भाग पाडलं नाहीं, इतकंच नव्हे, तर नुसत्या खुणेनं सुद्धां मी तसं सुचवलं नाहीं"

"मग गांवच्या लोकांनीं जे ढोल गळ्यांत बांधले आणि वाजवले ते तुमच्या चिथावणीनं नव्हेत तर ?"

" अर्थात नव्हेत—पंचांनीं वाटल्यास त्यांची जबानी घ्यावी. "

पांडुअण्णा आणि धोंडशेट पुढें आले आणि आपली जबानी घेतली जावी म्हणून आग्रह करूं लागले. पण विनायक तें मनावर घेईना. पंचकमिटींत आपसांत वाटाघाट सुरू झाली. पिढीजाद म्होरक्याला विनायकाचं तें मत पटेना, म्हणून तो स्वतः पुढं होऊन म्हणाला, "पांडुअण्णा आणि धोंडशेट यांची जबानी घ्यावी असा मी हुकुम करतों."

विनायकाचा नाईलाज झाला. पहिल्यानं त्यानं पांडुअण्णाला प्रश्न विचारले. त्यांत माझ्या सुरवातीच्या जबानींत आलेल्याच हकिकती होत्या. पुढचीं प्रश्नोत्तरं झालीं तीं अशीं:—

" मराठेगुरुजींच्या चिथावणीनं तुम्हीं गळ्यांत ढोल बांधला ना ? "

" मुळींच नाहीं. मला वाटलं म्हणून मी ढोल बांधला. "

" पण यापूर्वी कोणत्याही शिमग्याच्या वेळीं तुम्हीं असं केलं होतं का ? "

" नाहीं. "

" मग याचवेळीं तुम्हीं ढोल कां बांधला ? "

" मला बांधावासा वाटला म्हणून बांधला. ढोल बांधल्यानं काय होतं तें मला पहायचं होतं. शिवाशिवीवरचा माझा विश्वास आतां उडाला आहे म्हणून मी गळ्यांत ढोल बांधला. अन् ढोल बांधल्यावर मला असं दिसून आलं, कीं त्यामुळं माझ्यावर देवाचा कोप झाला नाहीं, कीं माझं बरंवाईटही कांही झालं नाहीं. "

विनायकाला पुढं प्रश्नच सुचेनात. तेव्हां दुसऱ्या ब्राह्मणपंचानं प्रश्न विचारायला सुरवात केली:—

" या अनाचाराबद्दल तुम्हांला वाळींत कां टाकूं नये ? "

" हा मुळीं अनाचारच नाहीं म्हणून. "

" वडिलोपार्जित रूढाचार तुम्हीं मानीत नाहीं काय ? "

" वडिलोपार्जित बऱ्याच रूढी आम्हीं आतां सोडल्या आहेत. त्यामुळं आमचं काहींच बरं वाईट झालं नाहीं. तेव्हां ही रूढी सोडून द्यावी असं मनांत आलं आणि मी तसा वागलों, यापुढं मीं कुणाची शिवाशिव पाळणार नाहीं. "

" तुमच्या घरची सारी मंडळीं सुद्धां शिवाशिव पाळणार नाहीं का ? "

" तें तुम्हीं त्यांना विचारा, मी माझ्यापुरतं सांगतोंय— "

हें उत्तर देतांना पांडुअण्णांनीं जो आवेश आणला होता त्याचा परिणाम प्रेक्षकांवर झाला. सर्वांनीं मोठमोठ्यानं टाळ्या पिटल्या. जनी ओरडली, " पांडुअण्णा कीं जय " !

त्यानंतर धोंडशेटची जबानी झाली. पहिले ठराविक प्रश्न आणि उत्तरं होऊन गेल्यावर खालील प्रश्नोत्तर झालीं.

" तुम्हीं गांवचे आचार मानतां कीं नाहीं ? "

" मी वेद मानतों. त्याखेरीज दुसरं कांहीं मानीत नाहीं. वेदांत वर्णभेद नाहींत. चार वर्ण नाहींत. मग पांचव्याचा काय प्रश्न ? अस्पृश्यता मला मान्य नाहीं. शुचि आणि अशुचि एवढंच मी पहातों. स्पृश्य आणि अस्पृश्य मी ओळखत नाहीं. "

विनायकानं विचारलं, " वेदांत शिमगा आहे का ? "

" वेदांत शिमगा नाहीं. शिमगा पुराणकालानंतर सुरू झाला. आणि आम्हीं तर म्हणतों, कीं आमचीं पुराणं म्हणजेच शिमगा. मी शिमग्यांत प्रामुख्यानं भाग घेत नाहीं— "

" पण भाग घेतां ?—मानापुरता तरी भाग घेतां कीं नाहीं ? "

" आजवर घेत होतों पण यापुढं घेऊं नये असं वाटलं होतं. पण यंदा मला नवी दृष्टि आली. अस्पृश्यता कांहीं काळपर्यंत नाहींशी होण्याची रूढी आहे. हवेंत कोणत्याही प्रकारच फरक न होतां, पंचमहाभूतांची किंवा ग्रहांची कोणत्याही प्रकारची उलटापालट न होतां, कांहीं वेळपर्यंत जर अस्पृश्यता नष्ट होते तर ती सर्वकाळ कां होऊं नये ? पूर्वी मला हें सुचलं नव्हतं. कारण पूर्वी मी या गांवच्या रूढचारांकडे बारकाइनं लक्ष देत नव्हतों, यावर्षी माझ्या तें ध्यानीं आलं... "

" मराठे गुरूजींच्या ढोल बांधण्यामुळं का ? "

" हो, असं म्हटलं तरी चालेल. दरवर्षी मी या प्रकाराच्या वेळीं हजर रहात नसें. यावेळीं हजर राहिलों म्हणूनच तें माझ्या नजरेला आलं आणि म्हणूनच मी स्वयंस्फूर्तीनं ढोल बांधला. कुणाच्या अनुकरणानं नव्हे. महारांत आणि माझ्यांत भेदभाव नाहीं—परमेश्वराच्या घरीं हा भेदभाव नाहीं, हें दाखवण्यासाठींच मी गळ्यांत ढोल बांधला— "

तितक्यांत कुठून तरी ढोलाचा आवाज ऐकूं आला. प्रश्नोत्तरं थांबून सगळेजण पाहूं लागले. मोठमोठ्यानं ढोल घुमवीत महारलोक येत होते. प्रेक्षकांनीं त्यांना वाट करून दिली. ते ढोल वाजवीत नाचत सभास्थानाच्या मध्यावर येऊन उभे राहिले तेव्हां कित्येकांची पांगापांग झाली.

पंच मोठ्यामोठ्यानं ओरडत होते—त्यांचं कुणिच ऐकत नव्हतं. धोंडशेटनीं एक ढोल घेऊन गळ्यांत घातला—मीही एक घेतला—आणखिही कित्येक जण पुढं सरसावले. 'स्वामी श्रद्धानंद आणि महात्मा गांधी' यांच्या नांवानं मोठमोठ्यानं जयजयकार होऊं लागला.

सर्वत्र पांगापांग झाली आणि पंचानांही अर्थातच निघून जावं लागलं.

कांहीं वेळपर्यंत एकामागून एक एकमेकांच्या गळ्यांतील ढोल काढून घेत प्रत्येक जण ढोल वाजवीत होता. आधींच गर्दी झालेली, त्यांतून ढोल कां वाजतात म्हणून कुतूहलानं आलेले गांवचे इतर लोक आणखि जमा झाले.

कोणताही उत्सव नव्हता—कोणंतही धर्मकार्य नव्हतं—सांथीची किरका नव्हती—तरीही ढोल वाजूं लागले म्हणून लोक बेगुमार गर्दी करून गोळा झाले. ही संधि साधून एका मोडक्या घराच्या भिंताडावर उभे राहून धोंडशेटनीं व्याख्यान द्यायला सुरवात केली.

धोंडशेट उभे रहातांच ढोल वाजवणाऱ्यांनीं आपली काठी थांबवली—एवढ्या जमावाला ऐकूं जाईल एवढ्या मोठ्या आवाजांत बोलायला धोंडशेटनां फार श्रम पडत होते. तरीही जीवाकडे न पहातां ते बोलत होते. त्यांच्या भाषणांत अस्पृश्यतानिवारणाबद्दलचे रोजचे ठराविक मुद्दे होते. मधून मधून ते स्वामी दयानंद, स्वामी श्रद्धानंद, महात्मा गांधी वगैरे अस्पृश्यतानिवारणाच्या पुरस्कर्त्यांचीं नांवं घेत त्यावेळीं टाळ्यांचा एकच गजर होई.

धोंडशेटचं भाषण जमलेल्या श्रोत्यांना शब्दशः कळत होतं कीं नाहीं याची मला तरी शंका होती. भाविकपणानं कीर्तन किंवा पुराण श्रवण करण्याची जी वृत्ति खेड्यांतल्या सामान्य माणसांच्या अंगी असते तिला अनुसरून प्रत्येक श्रोता कांहीं कळलं नाहीं तरी तें भाषण ऐकत होता.

धोंडशेटचं भाषण संपतांच किकी त्या पडक्या भिंताडावर चढली तेव्हां टाळ्यांचा एकच गजर झाला.

सुरवातीला तिनं कॉंग्रेसच्या कार्यक्रमाची साधारण माहिती देऊन नंतर प्रत्यक्ष निमगांवच्या परिस्थितीकडे नजर वळवली. गेल्या कांहीं महिन्यांत जें कार्य झालं होतं त्याचा आढावा घेऊन नंतर ती म्हणाली, "शिमग्याला मी विरोध करीत होतें. शिमग्यांत होत असणारे प्रकार मी लहानपणापासून पहात आलें होतें. मला त्या प्रकारांची चीड येत असे—शिसारी येत असे—ओकारी येत असे. पण गांवचे मानकरी स्वतःच या प्रकारांत भाग घेत होते तिथं परकी माणूस येऊन काय करणार ? मी त्यांतल्याच एका मानकऱ्याचीं मुलगी—मी

विरोध करण्यासाठीं उभीं राहिलें. पण विरोधानं ईर्षा वाढते हें मला माहित नव्हतं. खेड्यांतलीं माणसं म्हणजे सोज्वळ वृत्तीचीं माणसं. त्यांचं मन म्हणजे लहान मुलाचं मन. त्यांच्या मनांत कसलीच अढी कायम टिकत नाहीं. आज कुणि चूक केली तर ते त्याला पायांखालीं तुडवतील पण उद्यां त्याच्याहातून सत्कार्य घडलं तर डोक्यावर घेऊन नाचतील, अशा या भोळ्याभावड्या सरळ वृत्तीच्या तुम्हां लोकांचं मन मला कळलं नव्हतं–म्हणून मी विरोध करीत होतें. पण आतां कळलं–ज्या शिमग्याला मी विरोध करीत होतें त्या शिमग्यामुळंच कळलं—शिमग्यांतले ते जे ओंगळ प्रकार म्हणून मी म्हणत होतें त्यामुळं कळलं. गांवात मोठीं माणसं गळ्यांत ढोल घालून नाचत होतीं म्हणून माझ्या जिवाला यातना होत होत्या पण त्या एकाच रात्रीं ढोल घालून नाचण्याच्या प्रकारांत समतेचं केवढं मोठं तत्त्व सांठवलं होतं, याची कल्पना मला नव्हती. त्या एका रात्रींत ब्राह्मणापासून महारापर्यंत सारे एक होत होते. लहान–मोठा नाहीं, गरीब–श्रीमंत नाहीं, मानकरी–गांवकरी हा भेद नाहीं, शिवाशीवसुद्धां नाहीं ! त्यावेळीं जो शिवाशीव मानील तो पापी असं समजलं जात होतं. शिवाशीव मानली तर त्या एका रात्रीं जर पाप केल्यासारखं ठरतं तर बाकीच्या तीनशें चौसष्ट रात्रीं आणि दिवसा तें पाप म्हणून कां मानावं ?—अधर्म म्हणून कां मानावा ? काय त्या रात्रीं चंद्राच्या ऐवजी सूर्य उगवला होता ? काय त्या रात्रीं विस्तवानं कुणाचं अंग भाजत नव्हतं ? काय त्या रात्रीं माणसाच्या चामडीचा रंग बदलला होता ? त्या एकाच रात्रींत शिवाशीव मानली नाहीं कां, याचा कुणि विचार केला आहे ? मला वाटतं, पूर्वी ही शिवाशीव नव्हती. सगळेच भाऊ भाऊ होतें. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र अन् अतिशूद्र असे भेदाभेद नव्हते. मग कुणितरी ते भेदाभेद उत्पन्न केले. बळी तो कान पिळी अशी सत्ता सुरू झाली. एकजण दुसऱ्यापासून दूर होऊं लागला. एका काळच्या भावाभावांत वितुष्ट आलं म्हणूनच कुणा सज्जन माणसानं जुन्या काळाच्या आठवणीसाठीं ही सत्य-युगाची रात्र अंमलांत आणली. आपण रामजयंति करतों, कृष्णजयंति करतों, तसाच हा समतेचा उत्सव आहे. या दिवशीं रामाच्या आणि कृष्णाच्या आठवणींसारखीच, आपण एकाकाळीं एक होतों, याची आपल्याला आठवण होते, हें कुणाच्या ध्यानीं आलं नाहीं. वडिलोपार्जित आचार आहे म्हणून आपण तो पाळीत होतों, पण त्या आचाराच्या मागं उद्देश काय होता याचा आपण कधीं विचार केला नाहीं. मराठेगुरुजी मुंबईचे—त्यांना हें असलं कांहीं माहित नव्हतं. रोज हे प्रकार होत असलेले त्यांना मुंबईत दिसत नव्हते. शहर सोडून ते इथं आले म्हणून त्यांच्या दृष्टीला या प्रकारांतलं रहस्य उलगडलं–म्हणून त्यांनीं गळ्यांत ढोल बांधला. एवढा विद्वान माणूस गळ्यांत ढोल बांधतो म्हणून मला मोठी चीड आली. पण होळी लागल्यानंतर

जेव्हां त्यांनीं ढोल उचलला—शिवाशीव सुरू झाल्यानंतर जेव्हां त्यांनीं ढोलावर काठी मारली तेव्हां माझ्या कानांवरचे पडदे तुटून पडले. डोळ्यांवरची अंधेरी दूर झाली. सत्ययुगाचा काल मला आठवला. एका रात्रीपुरतं हें सत्ययुग सुरू झालं होतं असं त्यावेळीं मला कळलं. माझ्या ग्रामबंधूनों आणि वडील माणसानों, हें एक दिवसाचं सत्ययुग तीनशें पासष्ट दिवस अंमलांत आणतां येईल असं नाहीं कां तुम्हांला वाटत? एक दिवसांत जर शिवाशीव नाहीं, तर बाकीच्या तीनशें चौसष्ट दिवसांत शिवाशीव आपण कां मानायची? तसाच रोज सूर्य उगवतो आहे–तसाच मावळतो आहे––तसाच चंद्राच्या कला वाढताहेत—वारा वाहतो आहे—पाऊस पडतो आहे–जगाचं सारं रहाटगाडगं अगदीं त्याच कण्यावर फिरतं आहे. मग एवढाच हा फरक कां? कां म्हणून आपण शिवाशीव मानायची? मी पोर आहें तुमच्या समोर—पण तुमच्या गांवची आहें—तुमच्या घरची आहें. होळीच्या रात्रीसारखींच आज आपण एकमेकांत मिसळलों आहोंत. स्वामी दयानंद, स्वामी श्रद्धानंद, महात्मा गांधी यांची पवित्र नांवं घेऊन आज आपण शुचिर्भुत झालों आहोंत. आतां पुन्हां शिवाशीव झाली म्हणून घरीं जाऊन स्नान करायची जरूरी नाहीं. आजवर आपण आपल्याच भावाबंदांचा छळ केला. ते आपले होते. आपल्याला होत नाहींत तीं कामं ते करताहेत; त्यांचे आपल्यावर मोठे उपकार आहेत. आपल्याला होत नाहींत तीं—आपल्याला जीं घाणेरडीं वाटतात तीं सारीं कामं करून आपलं गांव जे स्वच्छ ठेवताहेत त्यांना दूर लोटणं—त्यांना न शिवणं—त्यांची शिवाशीव झाली तर आंघोळ करणं, म्हणजे कृतघ्नपणा आहे असं नाहीं का तुम्हांला वाटत? आजवर जो कृतघ्नपणा आपल्या हातून घडला त्याचं प्रायश्चित करण्यासाठीं आज आपण त्यांची क्षमा मागूं या आणि आजपासून या आपल्या निमगांवांत, अस्पृश्यता नाहींशी झाली म्हणून साऱ्या जगाला ओरडून सांगू या—"असं म्हणून तिनें त्या पडक्या भिंताडावरून खालीं उडी मारली आणि गळ्यांत ढोल बांधून एकचित्तानं तें भाषण ऐकत असलेल्या एका वृद्ध महाराच्या पायांवर आपली डोई ठेवली.

जिकडून तिकडून टाळ्यांचा कडकडाट झाला. धोंडशेट, अण्णा, मी देखिल किकीच्या अनुकरणानं जेव्हां त्या महाराच्या पायांवर डोकं ठेवून नमस्कार केला, तेव्हां त्या वृद्ध गांवकऱ्याच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. 'नको नको' म्हणून तो सारखा ओरडत होता. उलट आमचेच पाय धरायचा प्रयत्न करीत होता. पण कुणिच त्याचं ऐकलं नाहीं. एकामागून एक किती तरी माणसं त्याच्या पायावर आपलं डोकं ठेवूं लागलीं.

महाराकडचे ढोल काढून घेऊन पुन्हां आम्हीं गळ्यांत घातले आणि साऱ्या महारचांभा-रांना मध्यभागीं घेऊन मिरवणूक निघाली. आम्हीं महार बनलों होतों आणि महार–चांभार मोठे झाले होते.

कुणितरी धांवत जाऊन तितक्यांत फुलांच्या माळा आणल्या आणि सगळ्या महारचांभा-रांच्या गळ्यांत घातल्या. मिरवणूक आमच्या घराशीं धांबली. साऱ्या महार–चांभारांना मोठ्या आदरानं आम्हीं आमच्या ओटीवर नेऊन बसवलं. जनी आणि अण्णा यांनीं आधींच तयारी करून ठेवली होतीं. सर्वांना चहा देण्यांत आला आणि त्यांची भांडी आम्हीं स्वतः विसळलीं.

कुणाच्याही घराच्या उंबरठ्याच्या आंत उभ्या जन्मांत—नव्हें पिढ्यान् पिढ्या—ज्यांना पाऊल टाकायला मिळालं नव्हतं त्यांना गृहस्थाच्या घरीं हुड्त् हुडत न होतां चहा प्यायला मिळाल्याचा जो आनंद झाला होता त्याचं वर्णन करण्याची शक्ति माझ्या लेखणींत नाहीं. सर्वांचे डोळे ओले झाले होते. सर्वांची हृदयं भरून आलीं होतीं. सर्वांना हृदयांशीं कवटाळून आम्हीं निरोप दिला त्यावेळीं समाधानाचा केवढा तरी मोठा आनंद माझं हृदय फाडून बाहेर येईल कीं काय असं मला वाटूं लागलं.

चौकशी केली त्यावेळीं मला असं कळून आलं, कीं आमची सभा चालत असतां महार—वठारांत जाऊन जनीनंच त्या लोकांना ढोल घेऊन वाजवीत सभेच्या जागीं पाठवलं होतं.

प्रकरण नववें

# मी साम्यवाद शिकूं लागलों

आमच्या घरीं झालेल्या या समारंभानंतर गांवांत भयंकर खळबळ उडाली होती. पांडुअण्णासारख्या जुन्या वृत्तीच्या माणसानं या समारंभात प्रामुख्यानं भाग घेतल्यामुळं सर्वांनाच आश्चर्य वाटत होतं. विरोध होत होता तो पूर्वीप्रमाणें ब्राह्मणवठारांतील मंडळीकडून. बाबीकाका अगदीं उसळून उठले होते. त्यांच्या तोंडची भाषा जितकी जळजळीत तितकीच सभ्यपणाच्या मर्यादा ओलांडून केलेली असल्यामुळं तिचा परिणाम कांहीं ठराविक मंडळी खेरीज करून इतरांवर होत नव्हता.

खालच्या वर्गांतील सारी मंडळी जरी आम्हांला नांवं ठेवीत नव्हती, तरी अंतःकरणापासून ते आमच्यावर खूष होते असं म्हणतां आलं नसतं. खेड्यांतला माणूस सामान्यतः उत्सवप्रिय असल्यामुळं हाही एक उत्सवच झाला असं त्यांना वाटत होतं. होळीच्या एका रात्रींत जशी शिवाशीव पाळली जात नाहीं तसाच हाही एक दिवस पाळला गेला, असा समज त्यांनीं करून घेतला होता.

मी बारकाईनं पाहूं लागलों, त्यावेळीं माझं समाधान होईना. कांहींतरी अद्वितीय प्रकार घडवून आणायला आपण समर्थ झालों असं मला पहिल्यानं जरी वाटलं होतं, तरी विचा-

रान्तीं मी साशंक होऊं लागलों. या प्रकाराचा परिणाम चिरस्थायी होणार नाहीं असंच मला वाटूं लागलं.

किकी मात्र मोठ्या खुषींत होती. अस्पृश्यतानिवारणावर जास्त जोर द्यावा असं पहिल्यापासूनच तिला वाटत असल्यामुळं या प्रसंगांतून सुपरिणाम निर्माण होतील असा तिचा समज झाला होता. तिचा हा आत्मविश्वास इतका मोठा होता, कीं त्याबाबतींत तिच्याशीं चर्चा करण्याचं मला धैर्य होईना. झालेल्या प्रकारामुळं तिला वाटणाऱ्या समाधानाला धक्का देणं त्यावेळीं उचित झालं नसतं.

या प्रकरणीं अण्णाइतकाच जरी जनीनं पुढाकार घेतला होता तरी हा समारंभ उरकून गेल्यावर या विषयाची चर्चा करायचं ती बुद्धिपुरस्सर टाळीत होती. स्वतःवर खूष होऊन किकी ज्यावेळीं बोलूं लागे त्यावेळीं जनी आंबट तोंड करून उगीच बसून राही. किकीला तिचा राग येई. तरीही ती कांहीं बोलत नसे आणि म्हणूनच मीही या बाबतींत तिच्याशीं चर्चा करायचं सोडून दिलं होतं. माझ्याप्रमाणेंच तिचंही मन साशंक झालं होतं असंच मला वाटत होतं.

दुसऱ्या दिवशीं विनायक आला तेव्हां किकी त्याला चिडवूं लागली. पहिल्या खेपेला तो ज्या संकोचानं आमच्या बिऱ्हाडीं आला होता तो संकोच आतां राहिला नव्हता. म्हणूनच या विषयावर चर्चा करतांना त्याच्या भाषणांत पूर्वीच्यापेक्षां जास्त मोकळेपणा आला होता.

किकी म्हणाली, "केवढी मोठी चूक केलीस तूं, विनायक! परंपरा मोडणं हेंच आपलं कर्तव्य, असं रोज म्हणतोस, अन् कां त्या पंचकमिटींत जाऊन बसलास? शिमग्याविरुद्ध चळवळ करतांना तूंच पुढाकार घेत होतास अन् आतां तूंच यांना विरोध करायला उठलास, याचा मेळ कसा घालायचा?"

"मी कुठं विरोध केला?" विनायक उद्गारला, "माझी चळवळ होती, तीं शिमग्यांत होणाऱ्या बीभत्स आणि अश्लील प्रकारांविरुद्ध. प्रश्न उत्पन्न झाला होता तो बीभत्सतेबद्दल नव्हे. प्रश्न होता तो गळ्यांत ढोल बांधण्याचा. सभ्य माणसानं असा ढोल गळ्यांत बांधून नाचणं योग्य आहे असं तुला तरी वाटतं का?"

"अन् अयोग्य आहे असं का तुला वाटतं?" किकीनं विचारलं.

"हो!" विनायक म्हणाला, "ढोल बांधण्यांत माझ्या नजरेला फाका घालण्याइतकाच असभ्यपणा वाटतो."

"साम्यवादांत या सभ्यासभ्यतेच्या कल्पना येतात का?" किकीनं विचारलं, "समतेच्या तत्त्वावरच साम्यवादाची उभारणी केली आहे ना? मग बहुजनांतला—masses—मधला माणूस जसा वागतो तसाच बुर्झ्वा माणूस वागूं लागला तर तें साम्यवादाचं समर्थनच नाहीं का झालं?"

"अर्थात नाहीं!" विनायक उगनं अवमान आणून ठासून म्हणाला, "खालचा आणि वरचा थर एका समांतर रेषेंत यावा असं आम्हीं म्हणतों, याचा अर्थ त्यांनीं खालच्या थरांतल्या लोकांना आपलेच चोचले चालवायला उत्तेजन द्यावें असा करायचा नाहीं. समाजांतील दोष दोन्ही थरांच्या—किंबहुना तिन्ही थरांच्या लोकांत आहेत. त्या तिघांनाही एका पातळीवर आणणं हें आमचं ध्येय आहे. त्या ध्येयाला अनुसरूनच आमची पहिली चळवळ होती. मराठेगुरुजींनी जो प्रकार केला अन् जो आतां तुला आकर्षक वाटतोय तो या ध्येयाशीं विसंगत होता—"

"मग आम्हीं काय केलं पाहिजे होतं?" किकीनं मधेंच विचारलं, "बीभत्सपणा टाकून द्या, असं म्हणारे आम्ही मूटभरच होतों. आमच्या प्रयत्नांचा बहुजनांवर कांहींच परिणाम आला नाहीं. उलट मराठेगुरुजींनीं त्यांच्या पातळीवर खालीं उतरतांच सारे लोक त्यांच्या-भोंवती गोळा झाले—"

"हेंच, हेंच तें!" विनायक तिला अडवून म्हणाला, "आम्हांला जें नको आहे तें हेंच. प्रत्येक वेळीं जर आम्हीं त्यांच्या पातळीवर उतरूं लागलों तर ते पुढं आम्हांलाच खेंचून खालीं ओढतील आणि दोघांचाही सारखाच अधःपात होईल—"

"मला नाहीं असं वाटत," किकी म्हणाली "मराठेगुरुजींचं एक आवडतं तत्त्व आहे—" विनायक तुच्छतेनं हंसला असं पाहून किकी म्हणाली, "असं हंसूं नका. सर्वांचंच ऐकलं पाहिजे आपल्याला. मला तें तत्त्व आवडलं."

"वा! वा!" विनायक मान हालवीत म्हणाला. "असं तें कोणतं विलक्षण तत्त्व तें आम्हांला ऐकूं द्या तरी."

"तेंच मी सांगत होतें." किकी म्हणाली, "अधःपाताची त्यांनीं एक व्याख्या केली आहे—पाण्यांत बुडत असलेल्या माणसाला वांचवण्यासाठीं पोहणारा माणूस खालीं उडी घेतो. सकृद्दर्शनीं हा त्याचा अधःपात खरा पण तो अधःपात दुसऱ्याला जगवून वर काढण्यासाठीं असतो. मी पोहणारा आहें, बुडणारा नव्हे, ही जाणिव त्याच्या हृदयांत जागी असते. त्याचा तो अधःपात दुसऱ्याला वर ओढून आणण्यासाठीं असतो—तसं तो करूनही दाखवतो—दुसऱ्याला जगवतो—"

"अन् समजा," विनायक पुन्हां मध्येंच म्हणाला," कीं त्या दुसऱ्यानं त्याच्या गळ्याला मिठी घातली, घाबरटपणानं मिठी घातली अन् त्याबरोबर दोघेही बुडून मेले, तर त्या अधःपाताचं काय ?"

" हा ज्याच्या त्याच्या सामर्थ्याचा प्रश्न आहे. " मी म्हटलं, " अशावेळीं त्या दुसऱ्याला जगवण्यासाठीं त्याला लाथ मारून दूर करावा लागेल—कदाचित त्याला बुडून मरूं देणंही उचित ठरेल. पण खरा सामर्थ्यवान् माणूस असेल तो अशावेळीं त्याला जगवील अन् स्वतःही जगेल. परिस्थिति पाहिली पाहिजे अन् त्या बरोबरच त्या परिस्थितींत वावरणाऱ्या व्यक्तींची कुवतही अजमावली पाहिजे-त्याबरोबरच स्वतःच्या सामर्थ्यावरही विश्वास पाहिजे !"

विनायक क्षणभर स्वस्थ बसला आणि नंतर म्हणाला, " तात्त्विक चर्चा करतांना हे सारे मुद्द मोठे परिणामकारक वाटतात पण प्रत्यक्ष अनुभव असा येतो, कीं बुडत्याला तारायला जाणाऱ्या माणसाला बुडणारा माणूस उलट गळ्याला मिठी घालून बुडवीतच असतो. "

" हा निराशावाद झाला. " मीं म्हटलं, " मी आशावादी आहें. बुडत असतांना त्याला तारणाऱ्याला किती जणांनीं बुडवलं, याचा हिशेब घेण्यापेक्षां कितीजणांना जगवलं हेंच मी ध्यानीं घेतों—अन् ती संख्या मला मोठी वाटते. "

माझ्या या बोलण्यावर कोणत्याही प्रकारचा शेरा न मारतां विनायक नुसता मोठमोठ्यानं हंसला. किकीला तें आवडलं नाहीं. ती कांहीं तरी उत्तर देणार होती असं मला वाटलं, पण मी तिला डोळ्यांनीं दटावलं आणि म्हणालों, " माझ्या या भाषणांत विनोद कुठं झाला तो मला कळला नाहीं. सार्वजनिक कार्य करण्यासाटीं जो माणूस जगाच्या बाजारपेठेंत उतरतो त्यानं आशावादाचं भांडवल आधीं संग्रहीं ठेवलं पाहिजे असं मला वाटतं. एकदम जग उलथून टाकीन असं माणसाला वाटतं—जगाची लांबी रुंदी केवढी आहे याचा त्याला अंदाज नसतो. हें एवढं ल्हानसं खेडं, इथल्या साऱ्या माणसांना एका जागीं आणणंसुद्धां कठीण जातं आहे, तिथं एकदम जग उलथून टाकण्याची महत्त्वाकांक्षा मला तरी उत्पन्न होणार नाहीं. मी मुंगीच्या पावलानं चालणारा माणूस आहें आणि म्हणूनच आशावादाच्या आधाराशिवाय मला दुसरा कोणताच आधार मोठा वाटत नाहीं. "

" झालं तुमचं बोलणं ?" विनायक म्हणाला, " मी तुमच्या आशावादाला हंसलों नाहीं. माझं कारण निराळं होतं. पण तें तुम्हांला कळायचं नाहीं. तुमचे मार्ग आमच्या मार्गांपेक्षां फार निराळे आहेत. साम्यवादाचा अभ्यास जोपर्यंत तुम्हीं केला नाहीं तोपर्यंत तुम्हांला

त्याची कल्पना यायची नाहीं. तुम्ही मुंबईला होतां, तिथल्या कामगारांच्या चळवळी तुम्ही पाहिल्या असल्या पाहिजेत. आमच्या साम्यवादी पुढाऱ्यांनी सरकारला आणि सावकारांना कसं दे माय धरणी ठाय करून सोडलं तें तुम्हीं पाहिलंच असेल—"

"तें मी पाहिलं आहे–" मी म्हटलं, "पण त्या तुमच्या पुढाऱ्यांवर माझा आक्षेप आहे तो हाच, कीं त्यांनीं आपला संसार शहरांत थाटलाय. मुळाला हात घातला नाहीं. ते खेड्यांत आले नाहींत. शहरांतल्या बड्या बाजारांत थोडीशी गडबड झाली तरीही तिचा आवाज केवढा तरी मोठा होतो. खेड्यांत तसं नाहीं—"

" मग खेड्यांत कसं काय आहे ? " विनायकानं विचारलं.

" तुम्हीं इथलेच ना ? " मी विचारलं, " मग इथं कसं काय आहे, तें तुम्हांला सांगायला मी शहरच्या माणसानं कशाला श्रम घ्यावे ? "

" कसले ते इथले ? " किकी म्हणाली, " अन् मी देखिल इथलीच ना ? पण या गांवात कोणत्या जातीचीं किती माणसं आहेत एवढंसुद्धा मला माहित नाहीं. या इथनं मैलभर दूर असलेल्या माझ्या घराच्या आजुबाजूच्या चारदोन घरच्या माणसांपलीकडे माझी कुणाशीं ओळखसुद्धां नाहीं. तेंच त्यांचं ! "

" असं आहे खरं. " विनायक म्हणाला. " पण सध्यां या खेड्यांचा प्रश्न हातीं घ्यायचा नाहीं असं आम्हीं ठरवलंय. "

" आम्हीं म्हणजे कुणी ? " मी विचारलं.

" आम्हीं म्हणजे आमच्या साम्यवादी पक्षानं. " विनायक तुच्छतेनं हंसून म्हणाला, " पुन्हां पुन्हां तुम्ही हाच प्रश्न करतां तेव्हां मला तुमचं फार आश्चर्य वाटतं. शहर सोडून तुम्ही इथं खेड्यांत आलांत. पण या खेड्यांतलीं सारीं माणसं आज शहरांत गेलीं आहेत, आधीं त्यांच्यांत जागृति केली पाहिजे. कोणतीही चळवळ शहरांत सुरू झाली कीं तिचे परिणाम आपोआप खेड्यांत जाणवूं लागतात. खेड्यांकडेही आम्हांला पहायचं आहे—"

" तर मग खेड्यांकडे आधीं पहा. " मी शांतपणानं म्हटलं, " हें मूळ आहे, त्या शाखा आहेत. मूळाची जोपासना आधीं केली पाहिजे—खेड्यांतलीं माणसं शहरांत कां जातात त्याचं कारण शोधून त्याच्यावर उपाय योजिले पाहिजेत. खेड्याचं शहर झालं तर खेड्यांतली माणसं शहरांत जाणार नाहींत, म्हणून खेड्यांचं शहर कसं करतां येईल याचे प्रयत्न आधीं केले पाहिजेत असं नाहीं का तुम्हांला वाटत ?—"

## मी साम्यवाद शिकूं लागलों

बाहेरून विनायकला कुणीतरी हांक मारली. बहुधा त्याचा जोडीदार श्रीकांत असावा. 'आलों, आलों' म्हणत विनायक एकदम बाहेर निघून गेला तेव्हां किकी म्हणाली, " सुटला बिचारा ! बरं कारण मिळालं पळून जायला ! "

" तूंच म्हणते आहेस का हें ? " मी उद्गारलों.

" हो, मीच म्हणतेंय–" किकी म्हणाली, " मी हल्लीं अभ्यास करतेंय साम्यवादाचा. त्यांनीं पुस्तकं दिलीं आहेत मला. ' मार्क्स ' वाचतेंय ना ? लेनिन वाचतेंय, ' ट्रोट्स्की ' वाचतेंय, आणखी देखील किती किती पुस्तकें वाचतेंय. जरा थांबा, तुम्हांला दिपवून टाकणार आहें मी. त्यातलं एकसुद्धां पुस्तक तुमच्या हातीं लागूं देणार नाहीं. तुम्ही खुशाल हें निमगांवचं पुस्तक वाचीत बसा. आणखी सहा महिन्यांच्या आंत मी अशी बोलायला लागेन, कीं त्यांतलं एक अक्षरसुद्धां कळायचं नाहीं तुम्हांला—"

मी नुसता हसलों आणि उगी राहिलों. किकी विषयांतर करीत होती. अंगावर आलेली बाजू सांवरण्यासाठीं एका काळीं गंभीर वाटणाऱ्या विषयाच्या आधारावर ती थट्टा करूं पहात होती हें माझ्या ध्यानीं आलं.

" हें पहा, " किकी म्हणाली, " नुसतीं नावंच ऐकून तुम्ही थक्क झालांत ! एवढ्यांतच तुमची बोबडी वळली. आतां या साम्यवादांतली मराठी परिभाषासुद्धां मी शिकतेंय. ती तयार झाली कीं मग ऐकवतें तुम्हांला. सांगा, विरोधविकासवाद म्हणजे काय ? "

मी चांगला पोट भरून हसलों आणि म्हणालों, " मी शरणचिठ्ठी लिहून देतों. विरोध मला माहित आहे, पण हा तुझा कसला वाद तो मला माहित नाहीं अन् तो मला माहित व्हायलाही नको आहे. मला चर्चा करायची नाहीं, मला काम करायचं आहे. कुठ-ल्याही तत्त्वज्ञानाची परिभाषा पाठ करून मला त्याचा काडीभरसुद्धां उपयोग व्हायचा नाहीं. "

किकी क्षणभर स्वस्थ राहिली आणि म्हणाली, " क्षणभर थट्टा बाजूला ठेवून मी म्हणतें, जगाला दिपवून टाकणारं हें जें नवीन तत्त्वज्ञान अस्तित्वांत आलं आहे त्याचा अभ्यास करावा असं नाहीं का तुम्हाला वाटत ? "

"मला पुष्कळच शिकायचं आहे–" मी म्हटलं, "पण सध्यां मला काम पुष्कळ आहे. हा अभ्यास करायचं काम तूं कर अन् तुझ्या अभ्यासाचा फायदा मी घेईन. मधून मधून मला धडे देत जा. या तुझ्या नव्या तत्त्वज्ञानाच्या नियमांप्रमाणं माझ्या हातून कुठं चूक होत असेल तर मला सावध करीत जा. माझा प्रत्यक्ष अनुभव आणि तुझं पुस्तकी ज्ञान या दोहोंचा आपण

पडताळा घालून पाहूं, खूप चर्चा करूं अन् पुढं कसं वागायचं तें त्या चर्चेच्या निष्कर्षाच्या अनुरोधानं ठरवूं. सध्या मला पेंच पडला आहे तो या अस्पृश्यतानिवारणाचा–अन् त्याची चर्चा कांहीं तुझ्या पुस्तकांत सांपडणार नाहीं, ही माझी खात्री आहे–'' ती उत्तर द्यायला सरसावते आहे असं पाहून मी तिला थांबवलं आणि म्हटलं,'' तेंच बोलतों आहें मी ! जागतिक परिस्थितीच्या दृष्टीनं पहायचं म्हणजे त्याला एकच उपाय आहे–धर्माचं उच्चाटण करणं ! रशियांत तें झालंय म्हणतात पण तिथं सुद्धां चोरट्या धार्मिकतेचे भुंगे सोव्हिएट राज्याच्या इमारतीला आंतून पोखरित आहेत. मोठा कठीण आहे हा धर्माचा कैफ—नव्हे विष ! कित्येक पिढ्यांपासून हें विष आमच्यांत भिनून गेलंय. कायद्याच्या आधारावरसुद्धां त्याचं उच्चाटण करणं कठीण होईल असं आज मला वाटतंय. जोंवर कायदा करणं आपल्या हातीं नाहीं, तोंवर कोणत्या उपायानं हे धार्मिक भेदाभेद मोडायचे याचा विचार आपण केला पाहिजे. अन् तो उपाय कांहीं तुझ्या या साम्यवादी पुस्तकांत सांपडायचा नाहीं. सांपडलाच तर मला सांग म्हणजे झालं. ''

'' ठीक, ठीक, सांगेन बरं ! '' असं म्हणून किकी उठून गेली.

एवढा वेळ जनी मुकाट्यानं एका कोंपऱ्यात बसून आमची सर्व चर्चा ऐकत होती. किकी उठून जातांच तीही उठूं लागली असं पाहून मी म्हटलं, ''तूं कांहींच बोलली नाहींस जने?''

''मी काय बोलूं ?'' जनी अनिच्छापूर्वक म्हणाली, ''तुम्हां विद्वानांच्या या चर्चेत मला कांहीं सुद्धां कळत नाहीं. तुम्हीं मला बोलूं देतां म्हणून मी बोलतें. पण मग मला असं वाटतं, मोठ्यांच्या भाषणांत तोंड घालायचा मला काय अधिकार ? किती झालं तरी मी मोलकरीण ! तुमच्या कृपेनं मला आतां लिहितांवाचतां येऊं लागलंय. थोडंथोडकं इंग्रजीसुद्धां कळूं लागलंय. इतक्या थोड्या दिवसांत माझी भाषासुद्धां सुधारली आहे. पण मला काय उपयोग आहे या सर्वांचा ? केव्हां केव्हां वाटतं, आपली पायरी सोडून कशाला या भलत्या फंदांत पडतेंय. काय होणार आहे माझं पुढं ? चार दिवस या चळवळी चालल्या आहेत तोंपर्यंत तुमच्या आसऱ्यानं मी इकडे तिकडे थोडी हालचाल करीन. उद्यां तुम्हीं निघून गेलांत—तुम्हीं जाणार यांत शंकाच नाहीं–शहरची माणसं तुम्हीं, सारं आयुष्य इथं काढणं तुमच्यानं कांहीं व्हायचं नाहीं–तेव्हां तुम्हीं गेलांत म्हणजे मला कुणाशीं तरी लग्न लावून कुणाच्या तरी परसवांत नाहीं तर शेतांत आंग मोडून राबायला गेलं पाहिजे, याचाच विचार करतेंय मी. आतां तुमची ही चर्चा सुरू झाली त्याचवेळीं मला हें जाणवलं, कीं तुम्हीं ते तुम्ही अन् आम्ही ते आम्ही !'' असं म्हणून ती झट्कन उठून निघून गेली.

# मी साम्यवाद शिकूं लागलों

मला मोठा धक्का बसला. जनीला असं कां वाटलं ? इतके दिवस—नव्हे या क्षणापर्यंत प्रत्येक ठिकाणीं आमच्या पाठीशीं उभी राहिलेली जनी आज एकदम हताश होऊन बोलूं लागली, असं झालं तरी काय ?

माझ्या आशावादाशीं टक्कर द्यायला जनीनं हा निराशावाद सुरू केला का, अशी शंका एकदम माझ्या मनांत आली.

## प्रकरण दहावें

# आम्हीं पुनः तमाशा केला

गांवात आलेले तमाशेवाले अजून आजुबाजूच्या गांवांतून आपले खेळ करीत हिंडत होते. निमगांवातसुद्धां त्यांना आमंत्रण होतं. त्या आमंत्रणाला अनुसरून ते पुन्हां आले त्यावेळीं मी त्यांची मुद्दाम गांठ घेतली.

तमाशाचा इतिहास सांगण्याचं हें स्थळ नव्हे खरं पण त्यांच्या तोंडून ठिकठिकाणीं होणाऱ्या तमाशांबद्दल मला जी माहिती मिळाली त्यामुळं प्रचाराचं माध्यम म्हणून या साधनाचा उपयोग करण्याचा मी विचार करूं लागलों.

पुन्हां एकदां सर्वत्रांनीं तमाशा पहावा असं मला वाटूं लागलं. बीभत्स लावण्या अजिबात वगळून तमाशा करतां येईल कीं काय असं मी त्या म्हाताऱ्याला विचारलं, त्यावेळीं तो म्हणाला, "अशा साध्या लावण्या काय त्या एक रामजोशाच्याच आहेत. कांहीं कांहीं लावण्यांत कांहीं चरण गाळले तर बाकीच्या लावण्या तितक्याशा वाईट ठरायच्या नाहींत. लावण्या म्हटल्या म्हणजे त्यांत शिणगार पाहिजेच. शिणगार नसला तर ऐकणारे तेवढेसे खुलत नाहींत. कसं काय करतां येईल याचा मी अंदाज घेऊन पहातों. पण अगदींच सोंवळ्या लावण्या घेतल्या तर तमाशाला रंग भरायचा नाहीं हें मात्र मी तुम्हांला सांगून ठेवतों—"

दुसरा आणखि एक प्रश्न माझ्यासमोर आला तोही बीभत्सपणा इतकाच महत्त्वाचा होता. दौलतजादा करणं इष्ट नव्हतं. पण तमाशेवाल्यांच्या दृष्टीनं ती उत्पन्नाची बाब होती. म्हाताऱ्याला मी तसं विचारलं त्यावेळीं तो म्हणाला, "तें काम फार बिकट आहे. दौलतजादा बंद ठेवून चालायचं नाहीं. ती प्रत्येकाच्या उत्पन्नाची बाब आहे. त्याचं उत्पन्न कुणाला कमी तर कुणाला जास्त होतं. सर्वांना सारखीच रक्कम तुम्हीं आपण होऊन देऊं म्हणाल तर या बायांना तें पटायचं नाहीं. त्यांची अपसांत चुरस असते. दौलतजादा जास्त मिळवण्यासाठीं चढाओढीनं आणि चुरशीनं त्या आपलीं कामं करीत असतात. तेव्हां दौलतजादा अजिबात बंद केला तर तमाशा मुळीं व्हायचाच नाहीं."

ही एक मोठी पंचाईत आली. दौलतजाद्याला किकीचा मोठा विरोध होता, आणि म्हाताऱ्याचं म्हणणं तर मला पटत होतं. प्रश्न पैशाचा नव्हता. प्रश्न होता तो तमाशाच्या रंगतीचा. चवल्या उडाल्याशिवाय गाणारणींना गायला अन् नाचायला चेव येणार नाहीं असं म्हातारा म्हणत होता तें किकीला पटत नव्हतं. ती म्हणाली, "नाटकांतली पात्रं नाहींत का काम करीत? त्यांना कुठं कोण दौलतजादा करतं?"

"हा संवयीचा प्रश्न आहे," म्हातारा म्हणाला, "प्रेक्षकांत थोडीशी गडबड झाली तर नाटक करणारीं पात्रं घाबरून जातात. पण प्रेक्षकांत गडबड झाली नाहीं तर आम्हांला आमचा तमाशा रंगत नाहींसा वाटतो. प्रेक्षकांनीं मारे आरडाओरड केली, वाहवा दिली, चवल्या फेंकल्या, तरच आम्हां लोकांना गायला नाचायला चेव येतो. नाहीं तर अगदीं मुडद्यासारखं वाटतं."

दौलतजादा केल्याशिवाय गत्यंतर नाहीं असं वाटून मी त्याला संमति दिली याचं किकीला वैषम्य वाटलं. म्हातारा निघून गेल्यावर ती म्हणाली, "प्रत्येक ठिकाणीं पड खाण्याची तुमची ही वृत्ति मला कांहीं पटत नाहीं. काय झालं दौलतजादा केला नाहीं तर?"

"आपल्याला तमाशा करायचा आहे," मी म्हटलं, "तमाशाच्या पद्धतीनंच तमाशा झाला पाहिजे. कीर्तन वेगळं, पुराण वेगळं, नाटक वेगळं. तसाच तमाशाही! या प्रत्येक बाबतींत श्रोत्यांच्या बैठकाच वेगवेगळ्या प्रकारच्या असतात हें तूं पहातेस ना? त्यांचं तें बरोबर जाणतात. तमाशा करायचा आहे त्यांना. आपण जेव्हां तमाशे करूं त्यावेळीं नव्या पद्धति अंमलांत आणूं."

किकी एकदम हंसत सुटली आणि म्हणाली, "म्हणजे तुम्ही तमाशेही करणार आहांत कीं काय?"

" प्रचाराचं प्रत्येक माध्यम मला उपयोगांत आणायचं आहे. पांढरपेशांसाठीं जशीं व्याख्यानं कीर्तनं करायचीं, तसे बहुजनांसाठीं तमाशे करणं भाग आहे. तिथं व्याख्यानानं कांहीं परिणाम व्हायचा नाहीं. जिथं जें हत्यार परिणामकारक ठरेल तिथं तेंच वापरलं पाहिजे. आपल्याला कार्य करायचं आहे—तें कार्य परिणामकारक झालं पाहिजे. आपण कांहीं तरी केलं असं दाखवण्यासाठीं नुसतं प्रदर्शनच करायचं नाहीं. आमच्या कॉंग्रेस कमिट्यांचं चुकतंय तें इथंच. इथं काय केलं पाहिजे तें त्यांना वर माहित नसतं. हे एवढे हॅन्डबिलांचे भारे आमच्याकडे पाठवतात. कोण वाचणार ते ? जिथं कुणाला वाचतांच येत नाहीं तिथं हीं हॅन्डबिलं वाटायचीं कुणाला ? पांढरपेशांनांच ना ? ज्यांना कळायचं त्यांना कळतं आहे. अन् कळून सवरून ज्यांना विरोध करायचा आहे त्यांच्या हातीं ही हॅन्डबिलं देऊन कांहीं सुद्धां परिणाम व्हायचा नाहीं. कोणत्या प्रकारचा प्रचार खेड्यांत प्रभावी ठरेल हें शहरच्या खुर्च्याटेबलांवर बसणाऱ्या माणसांना कळत नसतं, हें इथं आल्यांनंतर मला कळलं. म्हणूनच मी तमाशे करून पहाणार आहे."

" आतां मार्गावर आलांत ! " जनी उद्गारली.

" कसला हा मार्ग ?" किकीनं विचारलं, " डफ तुणतुणं घेऊन नाचणार आहांत का तुम्ही ?"

" मीच कशाला नाचायला हवा ? हे आहेत कीं तमाशेवाले. यांनाच नाचवायचं आहे आपल्याला. पण तें आपल्या पद्धतीनं नाचवायचं आहे. त्यासाठीं नवे 'वग' लिहिले पाहिजेत, नव्या लावण्या केल्या पाहिजेत—सारी पद्धत बदलून टाकली पाहिजे. पण हा बदल करतांना तमाशाला पांढरपेशेपणाचं स्वरूप न येईल अशीच खबरदारी आपल्याला घ्यावी लागेल. "

किकी उगीच राहिली. माझ्या बोलण्यावर ती विचार करीत असावी असं मला वाटलं. जनीची मुद्रा मात्र खुलली होती. तिला माझी कल्पना पसंत पडली होती. पण तिनं तसं बोलून दाखवलं नाहीं.

आमच्या कॉंग्रेस कमिटीच्या तर्फे तमाशा होतो आहे असं ज्यावेळीं कळलं, त्यावेळीं गांवात एकच खळबळ उडाली. तमाशाच्या खर्चाचा भार धोंडशेट पांडुअण्णाप्रभृति मंडळीनीं आपल्यावर घेतला असल्यामुळं कॉंग्रेस कमिटीवर त्याचा बोजा येणार नव्हता. तरीही कमिटीच्या सभासदांत खळबळ सुरू झाली. कमिटीचं मत घेतल्याशिवाय तमाशा ठरवण्यांत आला म्हणून कित्येक मंडळी विरोध करायला पुढं सरसावली. या मंडळींना बाबीकाकाप्रभृति मंडळीचं जसं उत्तेजन होतं तसाच विनायक आणि श्रीकान्त यांचाही पाठिंबा होता असं मला दिसून आलं.

विरोधाला जागा राहूं नये म्हणून त्याच दिवशीं आम्हीं कमिटीची सभा बोलावली आणि तमाशा करण्याचा प्रस्ताव कमिटीसमोर मांडला. धोंडशेटना ही कल्पना फार आवडली होती. ठराव त्यांनीच मांडला होता. ठराव मांडतांना त्यांनीं जें प्रास्ताविक भाषण केलं तें फार परिणामकारक झालं. ते म्हणाले, " आपल्याला प्रचार करायचा आहे. खेड्यापाड्यांतल्या माणसाला लिहितां वाचतां येत नाहीं याची आठवण सुशिक्षित माणसांना नसते. सुशिक्षितांचे प्रयोग खेडवळाच्या डोळ्यांत भरायचे नाहींत. खेडवळाला खेडवळाच्याच भाषेंत सांगितलं पाहिजे. याचा अनुभव एकदां आम्हीं घेतला आहे. आपल्या कोंकणच्या लोकांना ती हकिकत माहित नाहीं—कोंकणांत ती चळवळ फारशी आलीच नाहीं. सातारा, कोल्हापूर अन् पुणें या भागांत सत्यशोधकांनीं जी चळवळ केली ती केवळ तमाशाच्या जोरावर. त्यावेळीं ब्राह्मणब्राह्मणेतर वाद मोठा जोरांत होता. खेड्यांतला शेतकरी सावकाराला देव मानीत होता. सावकाराचं अन्न खाऊन आपण वाढलों आहोंत असा त्याचा समज होता. सावकाराच्या विरुद्ध जायचं म्हणजे कृतघ्न व्हायचं असा समज त्यांच्या हाडीमाशीं खिळला होता. पांढरपेशे सावकार त्यांना पिळून काढीत होते—अजूनही पिळून काढताहेत—इथंही पिळून काढताहेत—त्या भोळ्या भाविक लोकांचे डोळे त्यावेळीं सत्यशोधकांच्या तमाशांनीं उघडून दिले. घाटावरच्या खेड्यांतला शेतकरी त्या तमाशामुळंच जागा झाला. धर्माच्या नांवाखालीं कुणाच्यावर जुलूम चालला होता.—अजूनही चालतो आहे—सत्यशोधकांच्या तमाशानं त्यांना तें दाखवून दिलं. धर्माची मिरास कांहीं नुसती एकाच जातीची नाहीं याची साक्ष त्यांना पटवून दिली. तो जो परिणाम झाला तो आज माझ्या नजरेसमोर आहे. त्यावेळचे मार्ग चुकले होते—नाहीं असं नाहीं. त्या तमाशांचं स्वरूप मोठ रांगडं होतं. अत्याचाराला चिथावणी देणारं होतं—म्हणूनच अत्याचार झाले. आज आपल्याला तसं कांहीं करायचं नाहीं. आपल्याला धर्मापेक्षां देशाचं नांव मोठं करायचं आहे. अत्याचाराचं बीं नाहीसं करून टाकायचं आहे. तें कसं करतां येईल हें पहायचंय म्हणूनच आपल्याला तमाशा करायचा आहे. आज होणारा हा तमाशा कांहीं आपला राष्ट्रीय तमाशा नव्हे. तमाशे जसे पूर्वी होत होते तसाच तो व्हायचा आहे. पण तमाशा कसा असतो हें ज्यांना माहित नाहीं त्यांना तो कळावा म्हणून आपल्याला तमाशा करायचा आहे.—म्हणूनच या खर्चाचा भार आम्हीं कमिटीवर घातला नाहीं. आम्हांला कमिटीचं नुसत नांव पाहिजे—कमिटीचा पैसा नको आहे. नांव पाहिजे आहे तें एवढ्यासाठींच, कीं पुढं आपण असे तमाशे करणार आहोंत,—त्या तमाशांतून कॉंग्रेसचा प्रचार करणार आहोंत. त्यांची जाहिरात एव्हांपासूनच

आपल्याला करायची आहे. एवढ्यासाठीं आजच्या या माझ्या प्रस्तावाला आपण विरोध करूं नका अशी हात जोडून माझी प्रार्थना आहे. ”

‘ सावकार आणि पिळणूक ’ या शब्दांचा विनायक आणि श्रीकांत यांच्या मनावर परिणाम झाला. सत्यशोधकांच्या इतिहासाची माझ्याप्रमाणेंच त्यांनाही कांहीं माहिती नव्हती. साम्यवाद लोकप्रिय होण्याच्या पूर्वीच, साम्यवादाची भूमिका समोर नसतांना, सत्यशोधक समाजानं एका काळीं जो प्रचार केला होता तो कशा रीतीनं परिणामकारक झाला होता याचा सर्व इतिहास विनायकानं विचारल्यावरून धोंडशेटनीं सांगितला. त्यावेळीं त्याच्याही मनावर परिणाम झाला.

विनायकाचा विरोध मावळतांच आमचं बहुमत व्हायला अवधि लागला नाहीं. विरोधाची पेरणी बाबीकाकांपेक्षां विनायकानंच जास्त जोरानं केलेली असल्यामुळं तो आमच्या बाजूला येतांच त्याच्या बाजूला वळलेले सभासदही सहजच आम्हांला अनुकूल झाले.

बाबीकाकाप्रभृति मंडळी कॉंग्रेसचे सभासद नव्हती. ते लोक सभासद असते तर बहुमत करणं आम्हांला कठीण गेलं असतं.

हा तात्विक विरोध मिटल्यामुळं तमाशा करणं जरी आम्हांला सुलभ झालं तरीही ब्राह्मण वठारांतील मंडळी शेवटपर्यंत आम्हांला शिव्या देत राहिली. इतरांना तमाशा हवा होता, गांवातले तमाशे होऊन गेले होते त्यामुळं आयताच आणखी एक तमाशाचा प्रयोग पहायला मिळतो आहे म्हणून सारेच उत्सुक होते, त्यांचंही समाधान झालं.

तमाशेवाल्या म्हाताऱ्याबरोबर बसून कार्यक्रम शक्य तितका सोवळा करण्याची आम्ही शिकस्त केली होती, पण त्याचा फारसा उपयोग झाला नाहीं. गाणाऱ्यांना आणि भाषण करणाऱ्यांना रंगणांत आल्यावर आवरणं शक्य नव्हतं. तमाशा सुरू होतांच पहिल्यानं जरी त्यांनीं संयम दाखवला तरी श्रोते रंगात येत नाहींत असं पाहून ते मूळपदावर आले. नित्याचा क्रम सुरू झाला तेव्हां आम्हीही त्याला विरोध केला नाहीं. दौलतजादाही झडलाच आणि तमाशेवाल्यांना उत्पन्नही चांगलंच झालं. सर्व लोक खुष होऊन कॉंग्रेस कमिटीला धन्यवाद देत आपापल्या घरीं गेले.

या परिणामामुळं माझा आत्मविश्वास जास्त दृढ झाला. तमाशाच्या दुसऱ्या दिवशीं विनायक आणि श्रीकांत आम्हांला भेटायला आले त्यावेळीं त्यांचं मत मी अजमावून पाहिलं. विनायक म्हणाला, “एकंदरीनं हा तमाशा अश्लील वाटतो खरा पण त्याचा परिणाम बहुजनांवर चांगलाच होतो यांत शंकाच नाहीं. यू एस्. एस्. आर् मध्यें असे ग्रामीण प्रयोग करण्यांत येतात असं म्हणतात. मग आपण तरी ते कां करूं नयेत ?”

"पाहिलंत ?" किकी म्हणाली, "तमाशा तुम्हीं पाहिला नव्हता तोंपर्यंत केवढा जोराचा विरोध करीत होतां ! आतां मत बदललं कीं नाहीं ? माझं सुद्धां असंच झालं होतं. एवढ्या बाबतींत तरी गुरुजींनीं आमच्यावर मात केली."

"मात करण्याचा प्रश्न नाहीं—" मी म्हटलं, "मला काम करायचं आहे इथं-अन् त्या कामासाठीं कोणतीं साधनं जास्त परिणामकारक होतील याचा मी सारखा शोध करतोंय. अचानक हें साधन माझ्या नजरेसमोर आलं. पूर्वीं याचा कुणि उपयोग केला होता तें मला माहित नव्हतं. धोंडशेटच्या तोंडून तें कळलं तेव्हां मला जास्त आत्मविश्वास वाटला. आतां तुम्हीं म्हणतां, कीं रशियांतदेखिल असे प्रयोग झाले होते त्यामुळं माझा विश्वास आणखि दुपटीनं वाढला आहे. तुमच्या सारख्यांची अनुकूलताही आहे. आतां पुढं काय करायचं हें आपण सर्वांनी एकमतानं ठरवलं पाहिजे—"

तितक्यांत पांडुअण्णा आले आणि त्यांनीं जी एक नवीन बातमी दिली त्यामुळं आमच्या चर्चेला अगदीं वेगळंच वळण मिळालं.

## प्रकरण अकरावें

# माझ्या हृदयाला बाण बसला

कॉंग्रेस कमिटीच्या वतीनं ज्यावेळीं तमाशा झाला त्यावेळीं बाबीकाका तिथं हजर नव्हते. पण ब्राह्मणवठारांतील इतर मंडळी आली होती. त्या मंडळींतील कांहीं मंडळी बाबीकाकांच्या वतीनं पांडुअण्णांना भेटायला गेली होती. तमाशा घडवून आणण्यांत किकीनं पुढाकार घेतल्यामुळं बाबीकाकांच्या मनावर परिणाम झाला होता. या परिणामाचं फळ बाबीकाकांना पश्चात्ताप होण्यांत होऊन किकीनं पुन्हां परत आपल्या घरीं यावं असं सांगण्यासाठीं त्यांनीं हें शिष्टमंडळ पांडुअण्णाकडे पाठवलं होतं.

पांडुअण्णाच्या तोंडून ही हकिकत ऐकतांच किकी स्तब्ध झाली. मलाही आश्चर्य वाटलं नाहीं. आज ना उद्यां असं कांहीं तरी होणार याची मला अपेक्षा होतीच.

विनायक आणि श्रीकांत यांना मात्र या प्रस्तावाबद्दल आश्चर्य वाटलं. तमाशा होण्याच्या दोनच दिवस आधीं विनायक आणि बाबीकाका यांची भेट झाली होती. त्यावेळीं बाबीकाकांनीं किकीबद्दल त्यांजकडे जे उद्गार काढले होते त्यावरून इतक्या लवकर एकदम त्यांना पश्चात्ताप होईल असं विनायकाला वाटेना.

किकी म्हणाली, " काकांचा असा प्रस्ताव असेल तर मी त्यांच्या आज्ञेबाहेर नाहीं. एक प्रकारें त्यांनीं होऊनच मला घराबाहेर काढलं होतं. आतां ते होऊन जर मला पुन्हां घरी बोलवीत असले तर मी तरी नाहीं कां म्हणूं ? "

किकीचे हे उद्गार ऐकून मात्र मी थोडासा चकित झालों. या प्रस्तावाला ती एकदम कबुली येईल असं मला वाटलं नव्हतं. आजवर झालेल्या प्रकारामुळं या बापलेकींमधील तेढ विकोपाला गेली होती. एकमेक एकमेकांच्या डोळ्याला डोळा सुद्धां देत नसतांना तिऱ्हाइतामार्फत आलेल्या या प्रस्तावासरशीं किकीनं एकदम परत घरीं जायला तयार व्हावं याचं मला आश्चर्य वाटलं. तरीही मी म्हणालों, " असं असेल तर फारच उत्तम. एक घर मोडल्याचा जो आरोप माझ्यावर आला आहे त्यांतून मीही मुक्त होईन."

" अन् मलाही बोलवलं आहे का बाबीकाकांनीं ?" जनीनं विचारलं.

" तुझा काय संबंध ?" पांडुअण्णा म्हणाले.

" कां बरं ? " जनी म्हणाली, " पूर्वी मी त्यांच्या घरींच काम करीत होतें ना ? मीही अशीच तिथून निघाल्यें होतें ना ? आतां त्यांनीं मुलीशीं समेट केला तसंच मोलकरणीशीं समेट कां करूं नये ? "

" म्हणजे मला उघडा टाकायचा तुम्हां लोकांचा विचार दिसतो आहे !" मी थट्टेच्या स्वरांत म्हटलं. "केव्हां एकदां बाबीकाकांचं आमंत्रण येतं म्हणून प्रत्येकजण जसं कांहीं टपून बसलं होतं. प्रत्येकजणाला जसा कांहीं इथं राहायाचा कंटाळा आला होता. खरंच आहे तें. इथं सुखानं अन्न खायला मिळत नाहीं, काम करावं लागतं, राबावं लागतं ! मग कसं काय किकी, शाळेंतली नोकरी सुद्धां सोडणार आहेस, कीं घरीं राहून शाळेंत येणार आहेस ? "

" तें काकांनाच विचारलं पाहिजे मला ! " किकी म्हणाली, " त्यांनीं नको म्हटलं तर कदाचित शाळेतलं कामही सोडावं लागेल मला. "

" तसा संभव दिसतो खरा ! " पांडुअण्णा म्हणाले. " हें नुसतं समेटच नव्हे—त्याच्या पलिकडचं आहे—" असं म्हणून पांडुअण्णा मिस्किलपणानं माझ्याकडे पहात डोळे मिचकावून स्वस्थ राहिले. त्यांच्या त्या खुणेचा अर्थ मला कळला नाहीं म्हणून मी विचारलं, "त्याच्या पलिकडचं म्हणजे काय आहे ? "

"लग्नाचा योग आहे—" पांडुअण्णा हळूच म्हणाले, "पण तें सांगायचं नाहीं असं मला बजावलंय."

किकीची मुद्रा एकदम पालटली. ती म्हणाली, "असं का ? एवढ्यासाठींच समेट व्हायचा आहे का ? ठीक आहे म्हणावं ! काकांना सांगा, मी परत घरीं यायला तयार आहें !"

विनायक आणि श्रीकांत नुसते ऐकत बसले होते. किकीच्या या उद्गाराबद्दल त्यांना आश्चर्य वाटलं असावं–पण किकीनं तसं सांगितल्यानंतर कुणालाच कांहीं बोलायची स्फूर्ति होईना.

बैठक आपोआप विस्कटली. पांडुअण्णा जायला निघाले त्यावेळी विनायक आणि श्रीकांतही निरोप घेऊन बाहेर पडले. किकीनं सर्वांना अगदीं हंसतमुखानं नमस्कार करीत निरोप दिला. ते तिघेही नजरेच्या टापूबाहेर जाईपर्यंत किकी त्यांच्याकडे पहात दारांत उभी होती.

ती आंत आली त्यावेळीं म्हणाली, " काय ? आला का हा डाव ध्यानांत ? "

" कसला डाव ? "

" कळलं नाहीं ? आमच्या कामाला खीळ घालायचा काकांचा हा डाव आहे. कसलं समेट आणि कसलं लग्न घेऊन बसलांहांत! कुठून तरी आमची जूट एकदां मोडून टाकावी असाच बेत आहे त्यांचा. विनायक अन् श्रीकांत आजवर विरोध करीत होते, ते तमाशाला आमच्याबरोबर हजर राहिले, तेव्हां त्यांचं अन् आमचं समेट झालं असं वाटून काका घाबरून गेले आहेत. अगदीं नक्की सांगतें मी—" एक क्षणभर स्तब्ध राहून ती म्हणाली, " लग्नाची गोष्ट पांडुअण्णांनी सांगितली त्याचवेळीं माझ्या डोळ्यांसमोर एकदम प्रकाश पडला. विचार करायला एक क्षणाचाही अवधि न घेतां मी होय म्हणून गेलें. तो अविचार नव्हता माझा. तेवढ्या एका क्षणांत मी कितीतरी विचार करून घेतलाय. आतां होऊन जाऊं द्या म्हणावं !—" असं म्हणून ती अगदीं विलक्षण रीतीनं मोठमोठ्यानं हंसली. तें तिचं भेसूर हसणं पाहून माझ्या अंगावर कांटा उभा राहिला.

जनी मुकाट्यानं आमचं हें भाषण ऐकत स्वस्थ बसली होती तिच्याकडे वळून किकी म्हणाली, " कां ? तुझी कां दांतखिळी बसली जने ? "

" दांतखिळी कसली बसायची —" जनी म्हणाली, " मी आपली माझा विचार करतेंय. तूं आपल्या घरीं जाशील, सुखानं नांदशील, आतां घरीं कोण नाहीं तेव्हां घरचा कर्तेपणा तुझ्याकडेच यायचा—बरी बाबीकाकांच्या संसारांत मिरवशील. अन् मी मात्र इथं चूल फुंकीत भांडी घाशीत एकटी पडेन त्यावेळीं माझं कसं होणार याचाच विचार मीं करतेंय !" बोलतांना जनीनं असा कांहीं गंभीरपणाचा आव आणला होता, कीं किकीच्या भाषणानं झालेला सारा परिणाम विसरून मी एकदम हंसत सुटलों.

" हसतां कशाला ? " जनी चिडखोरपणाचा आव आणून म्हणाली, " किकी गेल्यावर मी इथं राहीन असं का वाटलं तुम्हांला ? किकीला कांहीं वाटो, पण माझं मन सांगतं, कीं बाबीकाकांनीं काढलेली किकीच्या लग्नाची गोष्ट कांहीं अगदीं[च] बनावट नाहीं. माझ्या कांनींसुद्धां कांहीं कांहीं आलं होतं पण मी बोललें नाहीं. कुणि एक बालिष्टर आहे म्हणे मुंबईचा—त्यानं म्हणे मागणी घातली आहे किकीला ! तोदेखिल कॉंग्रेसवाला आहे वाटतं. ही

इथं काँग्रेसचं काम करतेय म्हणूनच त्याच्या तोंडाला पाणी सुटलंय—अन् म्हणूनच वाटतं, बाक्कीकाकाही तयार झालेयत. असं बालिष्टराचं स्थळ दवडील का कुणि हातचं ? काँग्रेसवाला असला म्हणून काय झालं ? —"

" भलतीच थट्टा करूं नकोस, जने—" किकी ओरडली.

" थट्टा नव्हे, " जनी म्हणाली, " चार दिवस झाले मला ही बातमी कळून ! पण तसं कांहीं बाहेर आल्याशिवाय उगीच कां बोला म्हणून मी गप्प होतें !— "

ती बातमी ऐकून किकीप्रमाणं मलाही धक्का बसला. जनी थट्टा करीत नव्हती खास ! गेल्या चार दिवसांत तिची वृत्ति बदलली होती हें मला स्पष्ट दिसत होतं. चारच दिवसांत का—पण अलिकडे बरेच दिवस तिच्या वृत्तींत झालेला बदल मला जाणवत होता. तमाशाच्या बाबतींत आम्ही ज्या उलाढाली करीत होतों त्यांत ती एकाद्या तटस्थ व्यक्तीप्रमाणें—अगदीं परक्यासारख्या वृत्तीनं सामील होत होती. कुठंतरी कांहीं तरी बिघडलं आहे असं मलाही वाटत होतं.

जनीची वृत्ति मला माहित होती. तसाच प्रसंग आल्याशिवाय कोणतीही गोष्ट ती केव्हांही उघडपणें बोलून दाखवीत नसे. कितीही महत्वाची बाब असेना पण ती दिवसांचे दिवस उक्त न करतां पोटांत ठेवण्याचं सामर्थ्य तिच्या अंगी होतें. म्हणूनच मला तिनं सांगितलेल्या या बातमीबद्दल शंका वाटेना.

जनीचं तें भाषण ऐकून किकी स्तब्ध होऊन बसली होती. ती विचार करीत असावी. मीही तिला विचार करायला अवसर दिला. ती आपण होऊन बोलल्याशिवाय कांहीं बोलायचं नाहीं असं ठरवून मीही तसाच स्तब्ध बसून राहिलों.

अगदीं अवकळा आल्यासारखी वाटत होती. एकमेकांकडे नुसतं पहायचासुद्धां धीर आम्हांला होत नव्हता. सकृद्दर्शनीं दिसणाऱ्या या अगदीं क्षुल्लक बातमीमुळं एका क्षणांत आमच्या त्या छोट्या संसारातलं आनंदाचं वातावरण असं गारठून जाईल असं मला वाटलं सुद्धां नव्हतं.

थोड्या वेळानं किकीला वाचा फुटली. जनीला उद्देशून ती म्हणाली, " केवढा घात केलास हा जने ! असं कांहीं असल्याचं तुला माहित होतं तर मला आधींच कां नाहीं सांगितलंस ? केवळ आमची कोंडी फोडण्याचा डाव काकांनीं टाकला असं समजून मी पांडुअण्णाकडे होकार दिला. आतां मला माघार घेतां येत नाहीं. असं कांहीं आहे असं आधींच कळतं तर मी तो प्रस्ताव तिथल्या तिथं धुडकावला असता. केवढा गाढवपणा केलास हा ! "

जनी ओशाळल्यासारखी झाली होती. अगदीं काकुळतवाणीनं ती म्हणाली, " मी तरी काय करूं ? चार मंडळी बसली असतांना मधेंच तुला बाजूला बोलावून सांगणं बरं दिसलं असतं का ? आधीं सांगावं असं मला वाटलं नाहीं—तुझी खात्री होती मला—पण पांडु-अण्णांनीं सांगतांच तूं एकदम होय म्हणून गेलीस तेव्हां उपायच हरला माझा —"

" झालं तें झालं—" किकी एक मोठा सुस्कारा सोडून म्हणाली, " आतां माघार घेतां येत नाहीं. काका आले तर मला घरीं गेलंच पाहिजे. येईल त्या प्रसंगाला तोंड दिलंच पाहिजे."

" म्हणजे ! " जनी घावरून म्हणाली, " लग्नाला होकार देणार आहेस कीं काय ? "

" तें आजच कसं सांगू ? " किकी गंभीर होऊन म्हणाली, " लग्न करायचं नाहीं अशी बढाई मी कधींच मारली नाहीं. प्रेमाची काव्यं गात मी कधीं बसलेंही नव्हतें. संसार थाटून पुढलं आयुष्य कांहातरी सत्कारणीं लावावं असंच मी आपल्याशीं म्हणत होतें. आज मी इथं आहें—तसं पाहिलं तर इथं मला फारसे क्लेश होत नाहींत—पण क्लेशांत दिवस काढायची माझी वृत्ति नाहीं. नाकबूल कशाला करूं, श्रीमंतीचा नसला तरी सुखाचा संसार थाटून रहावं असंच मला वाटत होतं. तसाच योग आला तर—" असं म्हणून ती एकदम स्तब्ध झाली.

" हो, तेंही खरंच ! " जनी म्हणाली, " तोही काँग्रेसवाला आहे म्हणे !—" जनीच्या उद्गारांतला खंवचटपणा मला जाणवल्यावांचून राहिला नाहीं. किकी आपल्याच विचारांत होती म्हणून कदाचित तो तिच्या ध्यानीं आला नसावा.

वातावरण अगदींच बिघडून गेलं होतं. तमाशाच्या प्रकरणीं मला जो नवा उत्साह निर्माण झाला होता त्याच्यावर हें विरजण पडलं. विरोधाचं बीज सर्व दृष्टीनं नाहींसं होण्याचा सुयोग आला असतांना मधेंच हा भलता प्रसंग ओढवलेला पाहून मी कासावीस झालों. प्रचाराच्या कार्याला आम्हीं जोरानं सुरवात केली होती. कित्येक दिवस थांबून राहिलेलं अस्पृश्यतानिवारणाचं कार्य आतां मार्गावर येणार या कल्पनेनं माझं अंतःकरण फुलून निघालं होतं. पण—

पण हें काय झालं ?

कार्याच्या गर्दींत ज्या मनोभावना हृदयाच्या तळाशीं दडपून राहिल्या होत्या त्या एकदम जाग्या झाल्या. किकीचे ते उद्गार माझ्या हृदयाला टोंचणाऱ्या बाणासारखे आदळले.

मी विचार करूं लागलों.

## प्रकरण बारावें

# मी पडताळा पाहूं लागलों

गेले कांहीं दिवस या प्रचाराच्या कार्यांत मी इतका गढून गेलों होतों, कीं माझ्या अंतःकरणातल्या तारुण्यसुलभ मनोभावना चुकून सुद्धां माझ्या जाणिवेंत येत नव्हत्या. मी एक पुरुष आणि दोन तरुणी—तशीच चौथी एक म्हातारी इतकीं माणसं आम्हीं या प्रपंचांत एका जागीं वावरत होतों. तरीही भेदाभेदाच्या कल्पना या कांहीं दिवसांत माझ्या मनांतसुद्धां येत नव्हत्या. कामाच्या गर्दीपुढं असले विचार मनांत यायला अवसरच नव्हता. बिछान्यावर पडल्यावर सुद्धां हेच विचार मनांत घोळत असत.

पण आज मला धक्का बसला. जुने विचार पुन्हां मनांत येऊं लागले. अगदीं पहिल्याच भेटीला किकी मुंबईच्या माझ्या खोलींत आली होती त्यावेळचीं आठवण झाली. त्यानंतर निमगांवात आल्यावर मनमोकळेपणानं तिनं आपण 'हेरून' ठेवलेलं स्थळ मला बोलून दाखवलं त्यावेळचीही आठवण झाली. आईच्या मृत्यूची बातमी ऐकूं येतांच अगतिकपणानं तिनं जो अविचार केला होता त्याचीही आठवण होऊन माझ्या अंगावर रोमांच उभे राहिले.

आणि आतां ती काय म्हणत होती ? सुखाचा संसार तिला हवा होता ! मग खरोखरच ती या कॉंग्रेसमन असलेल्या बॅरिस्टरशीं लग्न करायला तयार होणार होती का ?

तिला मतभेद नको होते. इथं मतभेदाचा प्रश्न नव्हता. तोही कॉंग्रेसमन होता—मुंबईचा कॉंग्रेसमन होता. बॅरिस्टर असल्यामुळं—विशेषतः कॉंग्रेसवाला बॅरिस्टर असल्यामुळं—त्याची प्रॅक्टिस देखील बरी चालत असेल. सुखाचा संसार थाटायला हें स्थळ एकंदरीत बरं होतं—माझ्यापेक्षां बरं होतं.

ही तुलना माझ्या मनांत कां आली ? संसार थाटण्याची कल्पना मला कधींच जाणवली नव्हती. मी माझ्या कार्यांत इतका रंगून गेलों होतों, विरोधामुळं जी ईर्षा उत्पन्न झाली होतीं त्या कैफानं मी इतका धुंद झालों होतों, कीं भविष्यकाळ मला दिसत नव्हता. निमगांवला आल्यापासून माझा प्रपंच वाढला होता. गांवातलीं सारीं घरं, त्या घरांतली सारीं कुटुंबं, त्या कुटुंबातलीं सारीं माणसं माझ्याशीं इतक्या आपुलकीनं वागत होती, कीं वैयक्तिक कुटुंबाची अंधुकशी कल्पनासुद्धां माझ्या मनांत येत नव्हती.

सुख असो कीं दुःख असो, दोन्हीं प्रसंगी आपुलकीच्या जिव्हाळ्यानं कौटुंबिक भावना दृढ होत असते. ती कौटुंबिकता पायाशुद्ध होण्याइतकी आपुलकी गांवातील प्रत्येक माणूस माझ्याशीं बाळगीत होता. कांहीं बाजूंनीं विरोध होत होता खरा पण त्या विरोधांतसुद्धां तितकीच कौटुंबिक आपुलकी होती.

कौटुंबिक सुखदुःखाची कल्पना पूर्वी मला नव्हती. मुंबईत असतांना कौटुंबिकतेला मी बहुधा पारखाच झालेला होतों. आई हयात असेपर्यंत जी कांहीं कौटुंबिकता वाटत असे तेवढीच—पण त्यानंतर मी आणि माझे वडील दोघेही फकिरासारखेच रहात होतों. चांगल्या भरगच्च वस्तीच्या चाळींत जरी आम्ही रहात होतों तरी शेजाऱ्यापाजाऱ्यांशींहीं आमचा फारसा घरोबा नव्हता. वर्तमानपत्रं वाचायला किंवा मागायला कुणि शेजारचा माणूस आमच्या घरीं येत असे तेवढाच. गॅलरींतून जाणाऱ्या बायकांपलीकडे कोणत्याच बायका आमच्या प्रपंचात केव्हांही येऊं शकत नव्हत्या. आईच्या हयातींत सुद्धां शेजारच्या बायकांची वर्दळ आमच्या घरीं फारच थोडी असे. कुणाही शेजाऱ्याच्या घरीं जाऊन बसण्याचा आमचा शिरस्ता नसल्यामुळं कुटुंबवत्सलता म्हणजे काय हें मुंबईत असेपर्यंत मला कळलं नव्हतं.

कुटुंबवत्सलतेची ही जाणीव निमगांवात आल्यावर उत्पन्न झाली—पांडुअण्णांच्या घरीं मी रहात होतों त्यावेळीं झाली. तें एक भरगच्च कुटुंब होतं. मुंबईच्या वातावरणांत तसल्याप्रकारचं कुटुंब शोधूनसुद्धां सांपडलं नसतं. कित्येक दिवसपर्यंत त्या घरांतल्या कुणाची बायको कोणती, हें सुद्धां मला कळून आलं नव्हतं. नवराबायकोनीं एकमेकांबरोबर बोलायचंसुद्धां नाहीं असा

खेडेगांवचा शिरस्ता असल्यामुळं त्या घराला एकाद्या मोठ्या खाणावळीचंच स्वरूप आल्याचा मला भास होई.

कौटुंबिकतेची जाणिव मला होऊं लागली ती हें स्वतंत्र बिऱ्हाड थाटल्यावर. त्या जाणिवेला पोषक होणारे असे जे लहानसहान प्रसंग त्यावेळीं घडून आले त्यांनीं माझ्या मनांत नव्या भावनांचं काहूर एकाकाळीं उत्पन्न केलं होतं. कार्याच्या व्यापामुळं तें काहूर हळूहळू मावळत गेलं आणि सामुदायिक कौटुंबिकतेच्या व्यापक जाणिवेनं वैयक्तिक भावना लोप पावल्या.

पण आज मात्र पुन्हां त्या जुन्या भावनेला नवा अंकुर फुटला असं मला वाटूं लागलं. बारकाईनं मी माझं मन पारखूं लागलों त्यावेळीं मला असं वाटलं, कीं हा नुसता नवा अंकुरच नव्हता. माझ्या नकळत पूर्वी केव्हां तरी उत्पन्न झालेल्या जुन्या अंकुराचा केवढा तरी मोठा वृक्ष झाला होता. एवढं लहानसं झुडुप नजरेला पडेल म्हणून मी पाहूं गेलों तों माझ्या सर्वस्वाला वेढून टाकणारा तो पल्लवछायेचा पसारा पाहून माझा मीच चकित झालों.

माझ्या हृदयाला बाण बसल्यासारखा झाला होता. खरोखरच किकी आपल्या बापाच्या घरीं निघून जाईल का ? खरोखरच त्यांचं समेट होईल का ? बाबीकाका म्हणजे मोठे मुत्सद्दी माणूस होते. पडेल त्या प्रसंगीं वाटेल तशी टोपी फिरवण्यांत त्यांचा हातखंडा होता. त्यांचं घराणं खानदानी होतं, तेव्हां अशाच खानदानी घराण्याशीं शरीरसंबंध होण्याचा योग येण्यांकरतां मुलीपुढं त्यांनीं सहज नमतं घेतलं असतं.

किकीचा स्वभाव एकंदरीत भावनात्मक होता. प्रेमाच्या गोष्टी ती जरी बोलत नसे तरीही प्रेमाच्या गोष्टी बोलणाऱ्या कॉलेजच्या विद्यार्थ्यांत ती मनमुराद मोकळेपणानं वावरली होती. ‘ प्रेम ’ या भावनेवर आपला विश्वास नाहीं असं ती बोलून दाखवीत असे पण तिच्या मनाचा अंत मला लागला नव्हता.

सुशिक्षित माणसांत अशिक्षितांपेक्षां दांभिकपणाची प्रवृत्ति मोठ्या प्रमाणांत असते असा माझा अनुभव होता. तसला दांभिकपणा किकीच्या ठायीं नसेल असं मानण्याजोगा पुरावा मला उपलब्ध झाला नव्हता. विशिष्ट प्रकारच्या तत्वज्ञानाच्या अभ्यासामुळं कदाचित दांभिकपणा नसतांनासुद्धां ती आपल्या मनोभावना दडपून टाकण्याचा प्रयत्न करीत असेल अशीही शंका क्षणभर माझ्या मनांत आली.

प्रेमाची भावनाच जर किकीच्या मनांत उत्पन्न झाली असेल तर तें स्थान माझ्याखेरीज दुसरं कोणतं असणं शक्य नव्हतं, असा माझा कयास होता.

तरीही मला शंका वाटूं लागली. खरोखरच प्रेमाची भावना तिच्या मनांत नसावी ! नाहींतर पांडुअण्णांनीं बावीकाकांचा तो निरोप सांगतांच ती एकदम ' होय ' म्हणून गेली नसती.

दुसरी एक शंका माझ्या मनांत आली. बावीकाकांनीं हा एक डाव टाकला आहे याची तिला जाणिव होती. त्या डावावर प्रतिडाव करण्याची एकादी कल्पना तर तिच्या मनांत आली नसेल ?

कां माझ्या मनाचा असा खळबळाट व्हावा ? इतके दिवस कधींही मनांत न येणारे हे विचार याचवेळीं कां उत्पन्न व्हावे ? खरोखरच माझं मन किकीकडे ओढत होतं का ? किकीशीं लग्न करून संसार थाटून निमगांवात ग्रामोद्धाराचं कार्य करीत रहावं, असंच माझ्या हृदयाच्या सांदीकोपऱ्यांत कुठं तरी जाणवळं होतं का ?

कीं हें प्रेम होतं ? प्रेम म्हणजे काय याची मला कल्पना नव्हती. प्रेमाची व्याख्या मला माहित नव्हती. प्रेमाच्या मनोविज्ञानाशीं मी अपरिचित होतों—कौटुंबिकतइतकाच प्रेमाचाही मला परिचय नव्हता. मग किकी आतां आपल्याला सोडून निघून जाणार,—तिचं कुणातरी अपरिचित माणसाशीं लग्न होणार, असं मनांत येऊन माझा जीव कासावीस कां झाला ?

किकी मला सोडून जाणार होती एवढ्यामुळंच का ? निमगांवसारख्या छोट्याशा गांवांत मी जो कार्याचा मोठा पसारा मांडला होता त्या पसाऱ्यांत अंतरींच्या जिव्हाळ्यानं माझ्याशीं सहकार्य करून, प्रतिकूल परिस्थितीला निधडेपणानं तोंड देणारी एक व्यक्ति—एक सुशिक्षित व्यक्ति—एक सहकारी-कमी होणार, एवढ्यामुळंच का मी अस्वस्थ झालों होतों ! माझ्या कार्याची हानी होईल एवढ्यामुळंच का मी एवढा घाबरून गेलों होतों ?

प्रांजलपणानें मी माझं मन पारखून पाहूं लागलों त्यावेळीं मला या प्रश्नाचं निश्चित उत्तर देतां येईना. दोन्हीं उत्तरं समोर येत होतीं. माझ्या सार्वजनिक कार्यांत मला एक कर्तबगार सहकारी जसा पाहिजे होता तसाच माझ्या जीवनाशीं सहकार्य करायला वात्सल्यपूर्ण अशा विशिष्ट प्रकृतीची आवश्यकताही मला जाणवत होती असंच मला वाटलं. आणि म्हणूनच किकी आपल्याला सोडून निघून गेली तर सार्वजनिक कार्याप्रमाणेंच माझ्या वैयक्तिक जीवनांतही मोठीच खोट पडेल अशी मला भीति वाटली.

तितक्यांत दुसरी एक कल्पना नजरेसमोर आली. किकी गेली तरी जनी इथं आहे ना ? किकीची उणिव जनीनं भरून काढली नसती का ?

जनी कर्तबगार होती, उत्साही होती, कर्तृत्वाच्या दृष्टीनं आम्हां दोघांपेक्षांही ती जास्त वाकबगार होती. तरीही तुलना करतांना मला असं वाटूं लागे, कीं किकी आणि जनी या दोघींच्या मनाच्या घडणींत मोठंच अंतर होतं. जन्मजात श्रेष्ठपणाचा परिणाम माणसाच्या मनावर स्वभावतःच

होत असतो. जन्मजात कनिष्ठपणाच्या जाणिवेनं जनीच्या मनांत न्यूनगंडाची भावना सतत जागी होती. तिचा तिलाच आपल्याबद्दल कमीपणा वाटत होता—तीव्रतेनं जाणवत होता. शिक्षणाच्या अभावामुळं त्या दोघींच्या मनोरचनेंत तुलनेनं वेगळेपणा दिसत असला तरी स्वाभाविक बुद्धिमत्तेंत जनी किकीपेक्षां अणुमात्र कमी नव्हती, इतकंच नव्हे, तर ती किकीपेक्षां थोडीशी श्रेष्ठच असावी असं मला केव्हां केव्हां वाटे.

पूर्वींच्या कुटुंबपद्धतीचा मी आढावा घेऊन पाहूं लागलों. माझे वडील सुशिक्षित होते पण माझी आई त्यांच्या मानानं अशिक्षितांत जमा झाली असती. आज थोड्याच काळांत का होईना, जनीनं जितकं शिक्षण संपादन केलं होतं तितकंसुद्धां शिक्षण माझ्या आईला मिळालं नव्हतं. असं असूनही हा विजोडपणा माझ्या वडिलांना कधीही जाणवला नाहीं कीं त्यांनीं कधीं तशी तक्रारही केली नाहीं.

कां हा विचार माझ्या मनांत आला ? जनीबरोबर संसार थाटावा अशी का कल्पना माझ्या मनांत आली होती ?

आली असली तर काय बिघडलं ? जातीच्या भेदापेक्षां दुसरा कोणता भेद या कल्पनेच्या आड आला असता ? अशिक्षित किंवा अर्धशिक्षित अशा माझ्या आईबरोबर माझ्या सुशिक्षित वडिलांचा संसार जर सुखाचा झाला—निदान दुःखाचा झाला नाहीं–तर त्या माझ्या आईपेक्षां जास्त शिक्षित आणि जास्त बुद्धिवान असणाऱ्या जनीबरोबर थाटलेला माझा संसार कां सुखाचा होणार नाहीं ?

मला वाटलं, मी भलतीकडे वहावत होतों. किकी आतां जाणार, तिचं लग्न होणार, हें निश्चित धरून चालत होतों, इतकंच नव्हे, तर पूर्वी किकी आपलीच होणार अशी अजाण भावना मनांत असतांना, आतां ती जाणार या सुजाण भावनेनं, मी भविष्याची तयारी करूं लागलों होतों.

माझ्या अंतःकरणांत चाललेल्या या खळबळींत एकदम हा अडथळा आला असं मला वाटलं.

आंतून गुणगुण ऐकूं येत होती. ती गुणगुण हळूहळू वाढूं लागली—मी विचार करीत असतांनाच ती गुणगुण वाढत चालली आहे असं अगदीं नकळत मला जाणवूं लागलं होतं. मी विचार करायचा थांबलों–त्यावेळीं किकी आणि जनी आंत बोलत आहेत असं मला स्पष्टपणें ऐकूं आलं.

बिछान्यांतून उठून मी दिवा लावला. दिव्याचा प्रकाश आंत त्या दोघींना दिसला असावा. दरवाजा उघडून त्या दोघीही बाहेर येऊन उभ्या राहिल्या.

प्रकरण तेरावें

# मी रडूं लागलों

“ कसलीं चाललीं होतीं खलवतं ?” त्या दोघी समोर दिसतांच मी एकदम प्रश्न केला. त्या दोघीही येऊन बैठकीवर बसल्या आणि म्हणाल्या, “ आमचीं कसलीं खलबतं बायकांचीं ?—”

दोघींच्याही तोंडून एकच वाक्य एकाच वेळीं आल्याचं ऐकून मला मोठं कौतुक वाटलं— “—आतां लग्न होणार आहे माझं—” किकी म्हणाली, “ या गांवच्या उठाठेवी सोडून स्वतःचा प्रपंच थाटून बसणार आहें मी. तेव्हां तो कसा काय थाटायचा याची आम्ही चर्चा करीत होतों—” मी मोठमोठ्यानं हसलों असं पाहून ती म्हणाली, “ कां ? हसलां कां ? ”

“ कां हसूं नये ? ” मी म्हटलं, “ कसा प्रपंच थाटायचा हें तुम्हां दोघींपैकीं एकीला तरी माहीत आहे का ? ज्यानं कुणि प्रपंच थाटला असेल अशाजवळ ही चर्चा केली असती—”

“पाहिलंस जने—” किकी म्हणाली, “हें असं आहे. पुरुषांच्या न् बायकांच्या मनोरचनेंतला जो फरक आहे तो हाच. यांना वाटतं, प्रपंच कसा थाटतात तो आम्हांला माहित नाहीं ! त्याला अनुभव लागतो हें खरं, पण ही अनुभवाची जरुरी जी असते ती पुरुषांना—बायकांना नव्हे. लग्न झालं

नसलं तरीही प्रपंच थाटायचं काम करणं बायकांच्या जातीला—नव्हे, पोरींच्या जातीलासुद्धां भाग पडत असतं, अन् त्याची यांना चांगली पारख असते. तेवढ्याचसाठीं जन्म आहे कीं नाहीं आमचा ! अगदीं परकऱ्या पोरी असतों आम्ही, तेव्हांपासूनच आमचा हा विचार चाललेला असतो, तेव्हांपासूनच आम्ही आजूबाजूला चोहींकडे पहात असतों, अंदाज घेत असतों, मनां-तल्या मनांत टिपणं करीत असतों, मनांतल्या मनांतल्याच का असेनात—पण त्या टिपणांच्या याद्या केवढ्या तरी मोठ्या असतात, तुम्हां पुरुषांसारख्या त्या टिपून ठेवाव्या लागत नाहींत आम्हांला ! कुठल्याही पोरीला विचारून पहा, ती तुम्हांला हेंच सांगेल. हें पहिल्यापासूनच सारं माहित असतं आम्हांला—"

" मग आतां कसलीं करीत होतां खलबतं ?" मी म्हटलं, " पहिल्यापासूनच तुम्हांला माहीत असतं ना ? मग त्याला खलबतं कशाला ? सरळ जायचं, लग्न करायचं, तिसरी घंटा झाली कीं नाटक सुरू. आधीं तालमी होऊन सारी तयारी केलेली असते ना ?" मी मोठ-मोठ्यानं हसलों. तें माझं हसणं माझं मलाच मोठं केविलवाणं वाटलं.

" असं रडकुंडीला यायला काय झालं ?" जनी म्हणाली.

" कोण आलं रडकुंडीला ? " मी विचारलं.

" तुम्ही ! " जनी म्हणाली, " तुम्ही बरं गुरुजी ! अगदीं रडूं येत असतांना हसायचा आव कशाला आणलात ? "

" रडूं येत असतांना ? " तितक्याच केविलवाणेपणानें मी म्हटलं, " मला कशाला रडूं येईल ? कांहीं मेलं नाहीं कोण माझं ! सारीं लाग्याबांध्याची माणसं पूर्वीच मारून मी मोकळा झालों आहें ! "

" तीं नात्याचीं—" किकी म्हणाली, " लाग्याबांध्याचीं नव्हेत. लाग्याबांध्याचीं माणसं आम्हीं—! मी, जनी, पांडुअण्णा, धोंडशेट, रामभाऊ अन् हीं इथं जोडलेलीं महारपोरं. हीं सारीं लाग्याबांध्याचीं माणसं ! यांतलीं एक मी आतां मरायला टेकलेंय म्हणून रडकुंडीला आलांत होय तुम्ही ? "

" मरायला ? " मी उद्गारलों.

" मरायला तर काय ? " किकी म्हणाली, " नांवाचासुद्धां मागमूस रहायचा नाहीं माझ्या. आम्हां पोरींच्या जातीचा मृत्यूच असतो हा. उद्यां नव्या नावानं कुणि अचानक ओळख करून द्यायला गेलं तर प्रत्यक्ष पाहीपर्यंत कुणाला ओळखसुद्धां पटायची नाहीं माझी. "

"म्हणजे हें अगदीं निश्चितच झालं तर !" मी उद्गारलों आणि त्याचवेळीं मला नकळत एक मोठा थोरला सुस्कारा माझ्या हृदयांतून बाहेर पडला.

"निश्चित काय आणि अनिश्चित काय--" किकी म्हणाली, "केव्हां तरी एकदां लग्न करायचंच आहे ना ? जनीनं सारी बातमी काढून आणलीय. बॅरिस्टर तर आहेतच पण चांगले श्रीमंत आहेत घरचे. एक दोन चाळी आहेत मुंबईत त्यांच्या. घरीं मोटरी आहेत—मोठा बंगला आहे मलबार हिलवर. शिवाय माथेरानला एक बंगला आहे. तिथं दर उन्हाळ्यांत जायला मिळेल मला. अन् त्यांतल्या त्यांत फुरसत मिळाली तर कॉंग्रेसचं देखिल काम करीन थोडसं—" ती मनःपूर्वक बोलत होती कीं नुसती थट्टा करीत होती याची अचुक अटकळ न येण्याइतका मी त्यावेळीं बेसावध झालों होतों, तें तिच्या लक्षांत आलं असावं. बोलत असतांना ती एकदम थांबली आणि म्हणाली, "काय ? ऐकूं येतंय का मी काय बोलतंय तें ? असे बावळ्यासारखे बघत कशाला राहिलां आहांत माझ्या तोंडाकडे ? कसला एवढा धक्का बसला ?"

"धक्का ? अन् मला ?" मी मोठं अवसान आणून म्हटलं, "हॅत् ! यांत कसला धक्का बसायचा ? केव्हां तरी तूं जाणार हें ठरलेलंच होतं. अजून तुझीं मतं निश्चित नाहींत. रोज बदलताहेत. अजूनही बदलतील ! कुणि सांगावं, बावीस सालीं कट्टर नाफेरवाले असलेले कित्येक जण जसे आज कॉंग्रेसचे कट्टे द्वेष्टे बनले आहेत तशी उद्यां तूंसुद्धां कॉंग्रेसद्वेष्टी बनशील—"

"अन् तुम्ही ?" किकीनं त्वेषानं विचारलं, "तुम्हीं नाहीं का बदलणार ? पुष्कळ बदलेयत कीं तुमच्यासारखे ! अजून इंगा फिरला नाहीं. अधिकार गाजवणं हें जिकडेतिकडे सारखंच आहे— मग तो कॉंग्रेसचा असो कीं सरकारचा असो. सत्ता आहे तिथं जुलूम हा असतोच. सरकारची सत्ता सक्तीची असते, कॉंग्रेसची सत्ता आम्हीं आपण होऊन आपल्या माथीं घेतलेली असते— एकूण तीही एक सत्ताच. असा केव्हां तरी प्रसंग यायचाच, कीं ज्यावेळीं कॉंग्रेसच्या अधिकाऱ्यांचा अन् तुमचा, कोणत्यातरी जिव्हाळ्याच्या विषयांत मतभेद होईल अन् तेव्हां मग तुम्ही देखिल उलटाल कॉंग्रेसवर ! अशी अगदींच हेटाळणी नको करायला. उद्यां मी बदलेन किंवा बदलणारही नाहीं—पण जनी म्हणते तसे तुम्हीं मात्र आज अगदीं रडकुंडीला आलां आहांत यांत मात्र शंका नाहीं. !"

"हींच का चाललीं होतीं तुमचीं खलबतं ?" मी पुन्हां उसनं अवसान आणून विचारलं.

"छे, छे, मुळींच नव्हे. पुढल्या संसाराचे नकाशे आंखीत होतों आम्हीं ! म्हटलं, इकडे श्रीमंती आहे भरपूर, तेव्हां जनीला देखिल बरोबर नेतां येईल कीं काय याची वाटाघाट चालली होती आमची !"

"मग ती तयार झाली वाटतं बरोबर जायला ?" मी दांतओंठ खात विचारलं.

" इतक्यांत कशी तयार होईन मी ? " जनी म्हणाली, " ती जाणार आहे बायको म्हणून. मी जायचीं असलें तर जाणार मोलकरीण म्हणून—"

"नाहीं–" किकी म्हणाली, "पाठिराखीण म्हणून ! "

" पाठिराखीण कांहीं जन्मभर रहात नसते कुणाच्या घरीं ! त्यांतून कदाचित मी गेलेंच तुझ्याबरोबर अन् तुझ्या नवऱ्याच्या नजरेंत भरलें—अन् त्याला वाटलं, कीं आपली राहूं दे ही अशीच इथं—तर मात्र मी तुझी पाठिराखीण शोभेन खरी—"

मला त्या दोघींच्याही भाषणांची अगदीं चीड येत होती. अशा गंभीर प्रसंगीं त्यांनीं जी ही टिंगल करायला सुरवात केली होती ती ऐकून माझं मस्तक भणाणून गेलं.

"कांहीं काळीज आहे का तुम्हां लोकांना ? " मी म्हटलं, " काय वाटेल तें बोलताहांत ! मी एवढा वेडा नाहीं. खलबतंच चाललीं असलीं तर तीं हीं नव्हतीं खास. मला कांहीं कर्तव्य नाहीं तुमच्या खलबतांशीं. फुटक्या तारवाच्या तीन तुकड्यांसारखीं तीन माणसं आम्ही, एक जागीं आलों आहोंत, उद्यां अशीच एकादी लाट येईल अन् तिघं तीन बाजूला जातील—"

" नाहीं–" जनी म्हणाली, " दोघं एका बाजूला आणि एक एका बाजूला !"

" आतां गप्प रहाशील जने, " किकी म्हणाली, " थट्टा पुरे कर. मी बोलत होतें ती अगदीं जिवाभावानं. खरोखरच मला मनापासून वाटतंय, कीं तिकडे चांगलं गडगंज असलं तर तुला घेऊन जाईन म्हणून. इकडे माझ्या या गांवालाही कांहीं मदत करतां येईल मला. चार पैसे मिळाले तर इथं करतां येण्याजोगीं कामं पुष्कळ आहेत. आज अडून बसलीं आहेत पैशापायीं—तीं तरी सुरू होतील. माथेरानसारखीं मधून मधून आम्हीसुद्धां येऊं इथं चार दिवस रहायला. इथं एक घरच बांधून टाकूं. त्याला म्हणूं निमगांवचं कॉंग्रेसहाऊस. तुझी आजी आहेच इथं गुरुजींची काळजी घ्यायला—"

" आतां मुकाट्यानं जाऊन निजा पाहूं– " मी चिडून म्हणालों," मला सारं कांहीं कळतंय ! बाहेरची मदत नको आहे आम्हांला. आम्हीं निमगांवचे लोक मोठे मानी आहोंत. कुणाचीही मदत घ्यायचे नाहीं आम्हीं ! कॉंग्रेस हाऊस बांधायचं असलं तर आमचं आम्हींच बांधूं ! थट्टा असो कीं खरं असो, तुझा प्रस्ताव कुणीच ऐकायचा नाहीं किकी. तसा प्रसंग तर येऊं दे, म्हणजे धोंडशेट अन् पांडुअण्णा काय उत्तर देतात तें ऐकूं येईल तुला—" मी चिडून बोलत असल्यामुळं रागाच्या शिरशिरीसरशीं मला पुढं बोलायला कांहीं सुचेना.

मी बोलतांना मधेंच थांबलों असं पाहून त्या दोघीही एकमेकीकडे पाहून डोळा घालून फिदीफिदी हसूं लागल्या. माझ्या अंगाचा भडका उडाला होता. एकेकीच्या एकेक थोबाडींत द्यावी आणि एकदम बाहेर निघून जावं अशी तिरमिरी मला आली होती. कधींच माझ्या मनावरचा तावा असा सुटला नव्हता.

अंतरांतून कुठून तरी साद आला आणि मी सावध झालों. मी म्हणालों, "—असं डोळे घालून हंसण्याजोगं काय आहे यांत? काल्पनिक श्रीमंतीनं एवढं हुरळून कशाला जायला हवं? कुणि सांगावं, एकाद्या भद्रेश्वर दीक्षितानं सांगितलेली ही श्रीमंतीही भुजंगनाथी असायची. आधीं त्याचा नीट तपास कर. काँग्रेसच्या कामांत पडणारे बहुतेक बॅरिस्टर 'ब्रीफलेस' असतात. काँग्रेसच्या कार्यक्रमांत चार ठिकाणीं नांव झालं तर प्रॅक्टीस वाढेल म्हणून काँग्रेसवाले बनलेले असतात. त्याची आधीं नीट चौकशी कर. नाहीं तर आगींतून उठून फुफाट्यांत पडल्यासारखं व्हायचं !"

"नीट चौकशी केली आहे मी !" जनी म्हणाली, "तो तुमचा भद्रेश्वर आणि भुजंगनाथ कांहीं मला माहित नाहीं पण हे खरोखरच चांगले मोठे श्रीमंत आहेत. नदीपलीकडच्या भिड्यांचा भाऊभट त्यांच्या घरीं पूजा करायला असतो. त्यानं सांगितली मला सारी हकीकत."

"पुजारी ना?" मी म्हणालों, "मग तो अस्सल भद्रेश्वर दीक्षितच असायचा. म्हणूनच म्हणतों, एकदां नीट काळजीपूर्वक तपास कर अन् मग जा बाबीकाकांकडे. निदान तुझ्या विनायक श्रीकांतांना तरी विचार. त्यांना माहित असेल !"—किकी माझ्याकडे रोखून पहात होती असं पाहून मी म्हटलं, "–काळजी काय ती तुम्हांलाच आहे अन् मला नाहीं वाटतं? तुम्हीं जशीं आंत खलबतं करीत होतां तसाच मीही विचार करीत होतों. थोडेच महिने का होईना पण आपण एका जागीं आलों होतों—दुःखाच्या काळांत एका जागीं आलों होतों. दुःखाच्या काळांत जोडलेलीं माणसं जन्मभर टिकून रहातात—निदान जे दुःखांत असतात, दुःखच अनुभवीत रहातात, त्यांना तरी दुःखाच्या काळांतले जोडलेले लागेबांधे विसरायला होत नाहींत. खरोखरच असं असेल तर तूं सुखाच्या काळांत आम्हांला विसरून जाशील किकी, पण हें निमगांव तुला विसरणार नाहीं. या निमगांवच्या पायीं तूं दुःख भोगलंयस, कष्ट सोसलेयस, जिव्हाळ्याच्या माणसांची ताटातूट झाली आहे या निमगांवच्या पायीं ! तें निमगांव तुला विसरणार नाहीं. समाधान मिळालं—सुख मिळालं—ऐषआराम मिळाला तर तूं विसरून जाशील या निमगांवला. पण दारिद्र्याच्या चटक्यांत होरपळणारं हें निमगांव मात्र तुला केव्हांही विसरणार नाहीं !" मी इतक्या कळकळीनं बोलत होतों, कीं माझं मलाच आश्चर्य वाटलं.

## मी रडूं लागलों

"ऐका तर खरं!" जनी म्हणाली, "जशी कांहीं निमगांवच्या मातीतंच यांची बाळंतीं वाळवलीं होतीं. चार दिवस येऊन झाले नाहींत निमगांवला अन् निमगांवचा निर्वाळा देतायत!"

"असंच होत असतं लग्न झाल्यावर," मी म्हटलं, "उभ्या जन्मांत माहित नसलेलं घर चार दिवसांत आपलं होऊन कुठलीही मुलगी त्या घराण्याचे अभिमान जसे एकदम माथीं वाहूं लागते, तसंच झालंय माझं. निमगांवची मुलगी नसलों तरी सून आहें मी—असंच-वाटतंय मला. इथल्या मातींत बाळंतीं वाळवलेल्या तुम्ही मुली आपल्या सासरीं निघून गेलांत अन् मी इथं परगांवचा आलेला असलों, तरी एकाद्या सुनेसारखा निमगांवचा प्रपंच चालवायचाय तो मलाच—" मी बोलत असतांना किकीचा चेहरा गोरामोरा होत होता. एकदम तिला भड-भडून आलं आणि ओक्साबोक्शीं रडत तिनं एकदम जनीच्या गळ्याला मिठी घातली.

मी नुसता पहात राहिलों. पहातां पहातां तो क्षण मला युगासारखा वाटला. त्या एवढ्याशा क्षणांत केवढा तरी मोठा इतिहास घडून गेला, असा क्षणभर मला भास झाला.

माझ्याही पोटांतून उमाळा आला आणि पुरुषपणाचा अभिमान विसरून मीही एकदम रडूं लागलों.

प्रकरण चौदावें

# मी बॅरिस्टर पाहिले

माझी ती स्थिति पाहून जनीला आश्चर्य वाटलं असावं. भुंवया वर चढवून एक क्षणभरच तिनं माझ्याकडं पाहिलं. मी ओशाळल्यासारखा झालों. मनांतला आवेग तिथल्या तिथंच कुंठित होऊन राहिला.

" असं आहे हें–" जनी म्हणाली, " जो तो स्वतःला फसवायला पहात असतो. पण फसवून किती फसवणार ? शेवटीं हें असंच व्हायचं. "

डोळे पुसून किकी दूर झाली आणि म्हणाली, " खरं बोललीस जने. किती खोटं बोलत होतों आपण आतां. कांहीं सुद्धां वाटत नव्हतं तसं बोलतांना. पण शेवटीं हें असं होतं. सर्वांना फसवतां येईल पण स्वतःच्या मनाला फसवतां येत नाहीं. अन् मग तें मन असं अचानक दगा देतं—" माझ्याकडे वळून ती म्हणाली, " कळलं का गुरुजी, आम्ही अगदीं वेगळंच बोलत होतों. अविचारानं मी चूक करून बसलें, ती आतां निस्तारायची कशी याची चर्चा करीत होतों आम्हीं. एकदां बोलून गेलें आहें खरी—आतां कांहीं मागं घेतां येत नाहीं. काका काय करतात तें मला पहायचं आहे. उद्यां ते बोलवायला आले तर मी घरीं जाणार, कुणि पहायला आले तर त्यांना पाहूं देणार, मग पुढं काय होईल तें होवो ! "

यावर मी कांहींच बोललों नाहीं. आणि बोलणार होतों तरी काय ? किकीनं आधींच सारं कांहीं ठरवून ठेवलं होतं.

जनीही कांहीं बोलली नाहीं. कांहीं वेळ असाच गेल्यावर मी म्हटलं, " आतां मुकाट्यानं आंत जाऊन निजा पाहूं. उगीच बोलत बसूं नका. त्यानं मनाला नुसता त्रास होतो मात्र—" कांहीं न बोलतां त्या दोघीही आंत निघून गेल्या.

दिवा मालवून मी बिछान्यावर पडलों. आतां माझं मन हलकं झालं होतं. विचारांचं चक्र फिरायचं थांबलं होतं. त्याला मुद्दाम गति द्यायची नाहीं असा निश्चय करून मी डोळे झांकून पडलों.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं बाबीकाका आले. ते आले ते हंसतच आले—जसं कांहीं मधल्या काळांत कांहीं वैषम्य आलंच नव्हतं. किकीही हंसत बाहेर आली. तिनं निघायची तयारी आधींच करून ठेवली होती. जनीनं तिच्या सामानाचा बोजा आणून बाहेर ठेवलेला पहातांच बाबीकाकाही क्षणभर चकित झाले. ते म्हणाले, " काठीनं पाणी दुभंगत नाहीं. माझ्याकडून देखिल थोडा निर्दयपणा झालाच—नाहीं तरी कसं म्हणूं ! पण झाल्या गेल्या गोष्टी होऊन गेल्या. मला वाईट वाटतंय तें एवढंच, कीं आतां तुम्हांला दुसरा कुणितरी मास्तर पहावा लागणार ! —आतां मास्तरीण मिळेल असं नाहीं वाटत मला. "

" मास्तरीणच पाहिजे असा कांहीं माझा आग्रह नाहीं. " मीं म्हटलं, " कुठून तरी शाळेचं काम सुरळीत चालू झालं कीं झालं."

" चालेल—चालेल—" बाबीकाका म्हणाले, " शाळा एकदां सुरू झाली आहे ती कांहीं आतां बंद पडत नाहीं. तुमचे कुणीतरी ओळखीचे असतील मुंबईला, त्यांना लिहून एकादा मास्तर बोलवून घ्या म्हणजे झालं." असं म्हणून नमस्कार करून बाबीकाका बाहेर निघाले. किकीही त्यांच्या मागोमाग निघाली आणि तिच्या सामानाचा बोजा डोक्यावर घेऊन जनीही तिच्या मागोमाग चालूं लागली.

क्षणभर मला चमत्कारीक वाटलं. जातांना किकीनं माझा निरोपसुद्धां घेतला नाहीं. पुन्हां असं वाटलं, निरोप कशाला घ्यायला हवा ? ती परत येणार होतीच !

पण पुन्हां मनांत शंका आली—किकीला खरोखरच मोह पडला तर ? किती झालं तरी बायकांचं मन—त्यांतून तो बॅरिस्टर. बरा चांगला देखणा असला, बोलण्यांत त्यानं छाप पाडली, कॉंग्रेसचा कळवळा दाखवला तर किकीचं मन अचानक बदलणार नाहीं कशावरून ?

ती मोठी भावूक होती. अविचारी नसली तरी अतिविचारीही नव्हती. परिस्थितीचा तात्कालिक परिणाम तिच्या मनावर नकळत होत असे. मधल्या काळांत म्हणूनच ना ती विनायक श्रीकांतांच्या आहारीं गेली होती ?

मी विचार करीत बसलों होतों तोंच जनी परत आली.

" मोठा खाष्ट आहे तो बामण ! " जनी उद्गारली, " मला घरापर्यंत कांहीं जाऊं दिलं नाहीं त्यानं. वाटेंत कुणि गडी भेटला त्याच्या डोक्यावर बोजा देऊन मला परत लावून दिलं— " मी कांहींच बोलत नाहीं असं पाहून ती म्हणाली, " किकीच्या घरापर्यंत गेलें असतें तर बरं झालं असतं, असं नाहीं तुम्हांला वाटत ? "

" काय करायचं तिच्या घरीं जाऊन ? " मीं म्हटलं, " ती स्वतः खंबीर आहे आपली काळजी ध्यायला. अन् त्यांतूनही तिचं मन फिरलंच, तर तूं अन् मी काय तिला अडवून ठेवूं शकणार ? "

" तिचं मन फिरेल असं वाटतं तुम्हांला ? "

" कुणी सांगावं. मला कुणाचाच विश्वास वाटत नाहीं. "

" माझासुद्धां ? "

" हो, तुझासुद्धां. माझासुद्धां. परिस्थिति माणसाला कशी गोत्यांत घालील हें कांहीं सांगत यायचं नाहीं. ती थट्टेनं म्हणत होती खरी, पण कष्ट काढायला कांहीं तिनं जन्म घेतलेला नाहीं—"

" अन् मी ? "

" तुझा जन्म कष्टांतच झाला आहे. तेव्हां यापुढं तरी कष्ट पडूं नयेत असं आजउद्यां तुला वाटूं लागलं तर तो कांहीं तुझा दोष ठरणार नाहीं. कष्टांत जन्म घेतला तरी कष्ट करीतच मरावं असं कांहीं माणसाला वाटत नाहीं. सुखाचा जीव कुणी आपण होऊन दुःखांत घालीत नाहीं. थोडं सुखं असलं तर आणखि मिळावंसं वाटतं—तसं कांहीं कष्टाचं नाहीं. थोडे कष्ट असले तर आणखि कष्ट काढायला मिळावे असं म्हणणारीं माणसं फार विरळा. त्या विरळा माणसांत कांहीं आपण येऊं शकत नाहीं. आपण आपलीं सामान्य माणसं आहोंत अन् म्हणूनच आपल्या हातून केव्हां कशा चुका होतील हें कांहीं निश्चितपणें सांगतां यायचं नाहीं."

जनी क्षणभर उगीच राहिली आणि नंतर म्हणाली, " मोठा संशयी स्वभाव आहे तुमचा. स्वतःवर तरी तुमचा विश्वास आहे कीं काय कोण जाणे ! "

मलासुद्धां हाच प्रश्न पडला होता. खरोखरच माझा स्वतःवर विश्वास होता का ?

जनी बोलत होती, " काल रात्रीं आम्हीं खूपखूप बोलत होतों. कसं बनवायचं त्या बालिष्टराला तें ठरवीत होतों. किती झालं तरी मुलीची जात—आई मेल्यावर घरीं काय झालंय हें कळायसाठीं तिचा जीव खालीवर होत होता. केव्हां तरी चोरूनमारून घरीं जाऊन

पहावं असं हजार वेळां तिच्या मनांत येई. म्हणूनच बाबीकाकांचं बोलावणं येतांच काल तिनं एकदम होकार दिला—मागलापुढला विचारसुद्धां केला नाहीं. एवढं खरं, कीं बापाचं आणि लेकीचं कधींकाळीं पटेल असं कांहीं मला वाटत नाहीं, इतका त्या बापाचा तिला तिटकारा आलाय."

तें ऐकून मला समाधान वाटलं. माझं मन मोठं साशंक झालं होतं. खरोखरच तिच्या वृत्तींत फरक पडला कीं काय अशी भीति मला वाटूं लागली होती. पण जनीनं तो संशय दूर केला आणि त्या बरोबरच ती भीतीही दूर झाली.

किकी नसल्यामुळं मला त्या दिवशीं घर ओकंओकं वाटूं लागलं. त्या दिवशीं ती शाळेंतही आली नव्हती. मुलामुलांतसुद्धां त्याच प्रकरणाची चर्चा चालली होती. शिकवण्याकडे कुणाचंच लक्ष लागत नव्हतं.एका मुलानं तर धिटाईनं मला प्रश्न केला, कीं तिनं राजीनामा दिला कीं काय म्हणून. तोपर्यंत ती बाब माझ्याही ध्यानांत आली नव्हती. 'राजीनामा आला असला तर तो बोर्डाकडे—माझ्याशीं त्याचा कांहीं संबंध नाहीं.' असं उत्तर देऊन मी त्या मुलाला गप्प बसवलं होतं.

त्या दिवशीं संध्याकाळीं विनायक मला भेटायला आला. या प्रकाराबद्दल त्यालाही आश्चर्य वाटलं—नव्हे, त्यालाही मोठा धक्का बसला. माझ्यापेक्षां किकी बऱ्याच विषयांवर बरीच चर्चा करीत असे ती विनायकबरोबर. म्हणूनच माझ्यापेक्षां विनायकाला तिच्या सर्वसाधारण मतांचा जास्त अंदाज होता.

म्हणूनच त्याला एवढा धक्का बसला. साम्यवादावरील पुष्कळसं वाङ्मय विनायकाच्या अनुषंगानं अलिकडे तिनं वाचून काढलं होतं. नावीन्यामुळं असो किंवा खरोखरच बुद्धीला पटल्यामुळं असो, साम्यवादाकडे तिच्या मनाचा ओढा बऱ्याच मोठ्या प्रमाणांत वळला होता. कॉंग्रेसच्या कार्यक्रमांत साम्यवादाचीं जीं बीजं रुजत चाललीं होतीं त्यांच्या जाणिवेनं ती साम्यवादाच्या चष्म्यांतून या कार्यक्रमांकडे पहात होती. विनायकानं सांगितल्यामुळं मला आतां कळलं, की धोंडशेटच्या नजरेखालीं ती अलिकडे वैदिक वाङ्मयाचाही अभ्यास करीत होती. साम्यवादानं दाखवून दिलेलं स्वाभाविक जीवन आणि वेदकालांत विद्यमान असलेलं त्याच प्रकारचं स्वाभाविक जीवन, या दोहोंच्या तुलनेनं ती आजच्या जीवनाकडे पहायचा प्रयत्न करीत होती. म्हणूनच माझ्यापेक्षांही विनायकच्या मनावर या बातमीचा परिणाम अगदीं वेगळ्या प्रकारें झाला.

जनीनं सांगितलेली हकिकत विनायकला सांगणं मला इष्ट वाटलं नाहीं. तें किकीचं रहस्य होतं. माझ्याकडे सुद्धां तिनं तें उघडपणें बोलून दाखवलं नव्हतं. अर्थात विनायक या बाबतींत अज्ञानांनच राहिला.

अलिकडच्या कांहीं प्रकारानंतर विनायकच्या मनावरही परिणाम झाला होता. कांहीं तरुण विद्यार्थ्यांच्या अनुकरणानं पहिल्या पहिल्यानं तो कॉंग्रेसच्या कार्यक्रमाची जरी हेटाळणी करीत असे, तरी आम्ही निमगांवात केलेल्या कार्याचा पडताळा किकीच्या सहवासानं मिळाल्यामुळं कॉंग्रेसच्या कार्यक्रमाबद्दल त्याचं मन डळमळूं लागलं होतं. आधींच स्वतंत्र असलेल्या राष्ट्रांच्या साम्यवादापेक्षां गुलामांचा साम्यवाद वेगळ्या प्रकारचा असला पाहिजे, असं त्यालाही वाटूं लागलं होतं. धार्मिक वैषम्य, धार्मिक मतभेद आणि समजूती यांचा बहुजनांवर बसलेला पगडा, साम्यवादाचं आकलन करण्याच्या कामीं कसा आडवा येत होता हें किकीनं त्याला पटवून दिलं होतं, असं त्याच्या बोलण्यावरून दिसून आलं.

माझी भूमिका प्रचारकाची होती खरी, पण मी एक कार्याचा प्रचारक होतों—मतांचा प्रचारक नव्हतों. मतप्रचाराचं काम हातीं घेण्याचा अजूनही मला धीर होत नव्हता. किंबहुना माझीं मतंच ठाम झालेलीं नाहींत असं मला वाटे. कॉंग्रेसचा कार्यक्रम हातीं घेऊन जरी मी प्रचारकार्य करीत होतों, तरीही ज्या कार्यकारणभावानं तो कार्यक्रम आंखला गेला होता, त्याच्या मुळाशीं जाऊन खोल विचार करण्याचा प्रयत्न मीं केला नव्हता, असं पदोपदीं मला जाणवत असे.

किकीची वृत्ति माझ्यापेक्षां अगदींच निराळी होती. मी अंधश्रद्ध नव्हतों खरा, तरीही किकी माझ्यापेक्षां जास्त चौकस होती—जास्त विचक्षण होती. एकलकोंडेपणाची संवय असल्यामुळं कोणत्याही विषयाचा काथ्याकूट करीत बसणं पहिल्यापासूनच मला रुचत नसे. कॉलेजांत असतांनापासून बडबड करण्याची अवास्तव संवय असल्यामुळं किकीला चर्चा करीत बसणं जास्त आवडे. म्हणूनच माझ्यापेक्षां विनायकला तिच्या मतांचा जास्त निश्चित अंदाज होता आणि म्हणूनच या अकल्पित पलटामुळं त्याच्या मनावर माझ्यापेक्षांही जास्त परिणाम झाला.

असेच चारपांच दिवस निघून गेले. रोज संध्याकाळीं येऊन विनायक माझ्याबरोबर चर्चा करीत बसे. त्यामुळं माझ्याही मनाला एक प्रकारचा विरंगुळा मिळत होता. जनी मुकाट्यानं आपल्या कामाला लागलेली होती. पूर्वीच्या दुप्पट उत्साहानं ती आपलं खादीच्या प्रसाराचं काम करीत होती. किकीला ती जाऊन भेटत होती कीं काय तें मला कळलं नाहीं. तिनं कांहींच सांगितलं नाहीं आणि मीही कांहीं विचारलं नाहीं.

# मी बॅरिस्टर पाहिले

शेवटीं तो बॅरिस्टर निमगांवात आल्याची बातमी ज्या दिवशीं आली त्या दिवशीं मीही कुतूहलानं त्याचं स्वागत करायला सामोरा गेलों. तो गृहस्थ पूर्ण खादीधारी होता. दिसण्यांत मोठा देखणा होता. त्याच्या अंगावरची खादी किंमतवान होती. खालीं सुरवार, अगांत तलम खादीचा झुळझुळीत नेहरू सदरा, त्याच्यावर नेहरूपद्धतीचं जॅकिटवजा कुडतं, डोक्याला रेशमी खादीची पांढरी टोपी असा त्याचा पोषाख पहातांच, गांवच्या मंडळींना त्याच्याबद्दल फारसा आदर उत्पन्न झाला नाहीं. ते तुलना करूं लागले. पांडुअण्णा म्हणाले, " तुम्हीही असेच आलां होतां गुरुजी. पण तुम्हांला पाहून आम्हांला परकेपणा वाटला नाहीं. तुमचा पोषाख हा आमच्यासारखाच असा गबाळ्या होता. केवढं अंतर आहे याच्या मुद्रेंत! आपण कुणितरी मोठे माणुस आहों, असं नुसत्या नजरेच्या फेंकीतच ठरवायला पहातोय बेटा ! "

" कॉंग्रेसवाला असो कीं कुणिही असो " रामभाऊ म्हणाले, " पण खादी चढवली तरी, लेकाचा आपली श्रीमंती आमच्या नजरेंत भरवायचा प्रयत्न करतोय. हंसतोय पहा कसा. किती खोटं हंसणं वाटतं याचं— "

" खरं आहे रामभाऊ, " धोंडशेट म्हणाले, " आपण कुठं तरी मोठ्या एकाद्या हिमालयाच्या शिखरावर उभे आहोंत अन् आम्ही लोक त्याच्या पायथ्याशीं कीडमुंगीसारखे लोळतों आहोंत, अन् त्या आम्हां लोकांचा उद्धार करण्यासाठीं स्वर्गांतून उतरलेल्या पैगंबराचाच आव आणलाय वेड्यानं ! लफंग्या आहे झालं ! "

धोंडशेट अगदीं चिडून बोलले. मला कांहीं तो लफंग्या वाटला नाहीं. पण आपल्या श्रीमंतीची जाणिव त्याला आहे एवढं मात्र माझ्या ध्यानांत आल्यावांचून राहिलं नाहीं.

त्याचं स्वागत उरकून मी ज्यावेळीं घरीं आलों त्यावेळीं जनी म्हणाली, " पाहिलांत का तो बगळा ? कसा मोरासारखा चालत होता ! अगदीं डोक्यापासून पायापर्यंत बनावट दिसतोय मेला ! — "

" जने ! जने !" मीं म्हटलं, "भलतंच कांहीं बोलूं नये. मुंबईत राहिली नाहींस तूं, त्यामुळं तुला असं वाटतं. अशी पुष्कळ माणसं आहेत तिकडे. पूर्वी अगदीं साहेब बनलेलीं होतीं हीं माणसं. तो साहेबी थाट टाकतांना खादी घेतली, तरी मुळची आवड नाहींशी करतां आली नाहीं त्यांना. श्रीमंतीचा परिणाम आहे तो !—"

" असेल आपल्या घरचा श्रीमंत ! " जनी म्हणाली, " आम्हांला काय करायचंय त्याच्याशीं ? पण मीं आज काय ठरवलंय माहित आहे तुम्हांला ? मी आज जाणार आहें पंधरावीस मैलांची मजल मारायला—तमाशेवाले आहेत तिथं. त्यांना बोलावून आणणार आहें.

पांडुअण्णांना माझी कल्पना आवडलीय. कॉंग्रेसकमिटीच्या वतीनं एक तमाशा करायचा अन् अध्यक्ष म्हणून या बगळ्याला बोलवायचं !—"

"आतां गप्प रहाशील जने ?" मीं तिला दरडावून म्हटलं, "काय बोलायचं असेल तें सरळ सरळ बोलावं."

"भाग्य समजा—" जनी म्हणाली, "कीं मीं त्याला नुसता बगळाच म्हटलं. चांगली कोंकणची शिवी दिली नाहीं, तुम्हांला आवडत नाहीं म्हणून. आम्हीं खेडवळ माणसं, आमची ही भाषा अशीच ! अशी नावं ठेवल्याशिवाय बरं वाटत नाहीं आम्हांला—तुम्हांला रुचत नसलं तर तुम्हीं नका बोलूं तसं !" असं म्हणून ती रागारागानं निघून गेली.

मी किती हांका मारल्या तरी येईना.

तमाशाची हकिगत तेवढीच राहिली. जनी जरी बोलली नाहीं तरी पांडुअण्णांनीं मात्र संध्याकाळीं मला तो बेत सांगितला. विनायकलाही तो बेत पटला. असं कांहीं करूं नये असं मला वाटलं होतं. पण माझं कुणिच ऐकेना. तमाशेवाल्यांना बोलवायला जनी छकडा करून केव्हांच निघून गेली होती.

त्या दिवशीं माझ्या अध्यक्षतेखालीं बॅरिस्टरसाहेबांचं व्याख्यान झालं. त्या व्याख्यानाची हकिकत मी द्यायला गेलों तर मला तुलना करावी लागेल—एवढं खरं, की त्यांचं भाषण शहरच्या दृष्टीनं जरी मोठं परिणामकारक झालं होतं तरी निमगांवच्या लोकांना तें चांगलंस कळलं नाहीं. तुलना होऊं नये म्हणून समारोप करतांना मीं नुसतं आभारप्रदर्शन करून थांबत होतों. पण गांवकऱ्यांना तें पटलं नाहीं. 'गुरुजी बोला, गुरुजी बोला' असं म्हणून ओरडत सर्वांनीं एकच गिल्ला केला. किकी त्यावेळीं हजर नव्हती. नाहींतर मीं तिलाच बोलायला सांगितलं असतं.

शेवटीं मला बोलावं लागलं. मी माझ्यापरीनं बोलून गेलों. माझ्या भाषणाला मधूनमधून खूपच टाळ्या पडत होत्या त्याचं बॅरिस्टरला वैषम्य वाटत असावं अशी मला शंका आली.

सभा संपल्यानंतर बॅरिस्टरनां घेऊन आम्ही सारे आमच्या बिऱ्हाडीं आलों.

बिऱ्हाडीं येतांच मी पाहिलं—मीं आश्चर्य चकित झालों.

पाहुण्याच्या स्वागतासाठीं किकी तिथं हजर होती.

## प्रकरण पंधरावें

# आम्हीं खलबतें केलीं

आमच्या स्वागताची तयारी जय्यत करण्यांत आली होती. ओटीवर मोठी थोरली बैठक घालून ठिकठिकाणीं तक्के ठेवले होते. दाराला तोरणं लावलीं होतीं. तो सारा थाट पाहून मी आश्चर्यचकित झालों.

पाहुण्यांना अग्रस्थानीं बसवून आम्ही सर्व मंडळी अदबीनं समोर बसलों. स्वतःच्या मोठेपणाची बॅरिस्टरसाहेबांना जाणीव असावी—ते ऐटीनं तक्क्याला टेकून बसले.

चहा घेऊन आंतून येणारी मंडळी पहातांच मला अधिकच आश्चर्य वाटलं. त्या बहुतेक गांवच्या महारांच्या मुली होत्या. सर्वांच्या पुढं चहाचे पेले ठेवीत असतांना किकी म्हणाली, "या आमच्या गांवच्या मिराश्यांच्या मुली आहेत—म्हणजे महारांच्या—म्हणजे हरिजनांच्या. त्यांनींच केलाय हा चहा–अन् फराळाचं पण त्यानींच केलंय! मी नुसती देखरेख करीत होतें."

बॅरिस्टरसाहेबांना संकोच वाटायचं कांहीं कारण नव्हतं. पण आमच्या या बैठकींत योगा-योगानं बाबीकाका आले होते. तो सारा थाट पाहून ते संकोचित झाले होते. चहाचा पेला उचलून घेतांना बॅरिस्टरनीं एकदां बाबीकाकांच्या डोळ्याला डोळा दिला आणि म्हटलं, "तुम्हां लोकांना मोठं कौतुक वाटतं या गोष्टीचं. पण विलायतेंतून जाऊन आल्यावर या असल्या

प्रपंचाचं कांहीं वाटत नाहीं. अन् तिथं मुंबईत तरी हॉटेलांत नोकर कोण आहेत? ख्रिश्चन, मुसलमान असलेले आम्हांला चालतात, मग बिचाऱ्या महारांनींच काय अपराध केलाय?"

"खरं आहे, खरं आहे," चहाचा पेला दूर लोटीत बाबीकाका म्हणाले, "पण मी अवेळीं चहा घेत नाहीं—कांहीं खात सुद्धा नाहीं—"

"मग नुसतं पाणीच आणून देऊं का?" किकीनं विचारलं, "इथं कांही तरी घेतलं पाहिजेच—नाहीं तर पंक्तिप्रपंच केल्यासारखं नाहीं का व्हायचं!"

"नको, नको, कांहीं नको." बाबीकाका म्हणाले.

पांडुअण्णांनीं माझ्याकडे पाहिलं, मी धोंडशेटकडे पाहिलं, धोंडशेटनीं पुन्हां माझ्याकडे पाहिलं.

सर्वांचा फराळ सुरू झाला. फराळ चालू असतांना बॅरिस्टरसाहेब मुंबईच्या गोष्टी सांगत होते त्यांत स्वतःचा बडेजावच फार मोठा होता. बोलतांना चारदोन वेळ उगीच गांधीजींचं नांव घ्यायचं, एकेरी भाषेंत वल्लभभाइ, भुलाभाइचा उल्लेख करायचा आणि अशा रीतीनं त्या मोठमोठ्या व्यक्तींशीं आपला अगदीं निकटचा परिचय कसा आहे याची जाणिव आम्हांला करून द्यायची, असा त्यांचा उद्देश होता असंच मला वाटलं.

दाराजवळ उभीं राहून किकी सारं भाषण ऐकत होती. बोलत असतांना महत्वाच्या भाषणाच्या वेळीं बॅरिस्टरसाहेब पुन्हां पुन्हां किकीकडे पहात होते. तीही त्यांच्या नजरेला नजर देऊन उगीचच हंसत होती.

जनी मात्र दूर एका कोपऱ्यात उभीं राहून निरीक्षण करीत होती. या समारंभात तिनं कसलाच भाग घेतला नाहीं याचं मला आश्चर्य वाटलं.

मंडळी जायला निघाली तेव्हां पांडुअण्णांनीं पुन्हां एकदां तमाशाचं निमंत्रण दिलं तेव्हां बॅरिस्टर म्हणाले, "हा तमाशा म्हणजे काय आहे?"

"तेंच तुम्हीं पहावं अशी आमची इच्छा आहे." पांडुअण्णा म्हणाले, "आपल्या या ग्रामोद्धाराच्या कार्यांत त्याचा फार उपयोग होईल असं आमच्या गुरूजींनां वाटतं. आपल्या-सारखीं माणसं आलीं आहेत, त्यांनीं पाहिलं, ठरवलं, तर आम्हांलाही थोडासा आत्मविश्वास येईल."

"ठीक आहे." म्हणून बॅरिस्टरसाहेब जायला निघाले. बाबीकाकाही त्यांच्या मागोमाग निघाले असं पाहून हळूच जनीच्या कानांत कांहींतरी सांगून किकी त्यांच्याबरोबर निघाली. बाबीकाका क्षणभर थांबले आणि म्हणाले, "तूं कशाला आमच्या बरोबर येतेस क्रमा?"

बाबीकाकांचं बोलणं ऐकलं न ऐकलंसं करून किकी तडक बाहेर निघाली. मुलींनीं पुरुषांबरोबर जायचं ? तोंड वाकडं करून बाबीकाकांनाही बरोबर जाणं भाग पडलं.

सारी मंडळी पुन्हां येऊन ओटीवर बसली तेव्हां धोंडशेट म्हणाले, " तुम्हीं कांहीं म्हणा गुरुजी, पण हा माणूस मला लफंग्या दिसतो. खरोखरच कॉंग्रेसमधें तरी हा आहे का ? "

" हो, " मी म्हटलं, " कॉंग्रेस कमिटीच्या सभांतून वारंवार झालेल्या त्यांच्या भाषणाचे रिपोर्ट मीं वाचले आहेत. "

" अशींच माणसं आहेत का तुमच्या मुंबईच्या कॉंग्रेस कमिटींत ? " धोंडशेटनीं विचारलं.

" तसं पाहिलं तर—" मी म्हटलं, " कमिटींतल्या कुणाच सभासदाचा अन् माझा प्रत्यक्ष परिचय नाहीं. सारा पत्रोपत्री व्यवहार चाललेला आहे. मुंबईला असतांनासुद्धां मी कधीं कॉंग्रेस हाऊसमधें जात नसें. गेलोंच तर इतर चार प्रेक्षकांसारखा बाहेर उभा रहात असें. त्यामुळं कुणाचाच मला प्रत्यक्ष परिचय झालेला नाहीं. "

" मला आश्चर्य वाटलं, " धोंडशेट म्हणाले, " मोठमोठ्या माणसांचीं एकेरी नांवं घेऊन जेव्हां तो बोलूं लागला तेव्हां मला संशयच आला—"

" त्यांत कांहीं अशक्य नाहीं, " मीं म्हटलं, " कमिटींत असल्यामुळं या लोकांच्या गांठी-भेटी होणं मुळींच अशक्य नाहीं. बॅरिस्टर आहेत–तेव्हां निकट परिचय असणंही कांहीं तितकंसं कठिण नाहीं. "

" असेल कदाचित् ! " धोंडशेट म्हणाले, " पण हा माणूस कांहीं मला सच्चा वाटत नाहीं. पण ही किकी त्याच्यावर अगदीं खूष असल्यासारखी दिसतेय. असं आहे हें ! शिक्षणानं माणूस केव्हां केव्हां आंधळा होतो तो हा असा ! आम्ही अशिक्षित लोक, प्रत्येक जागीं साशंक मुद्रेनं पहायची आम्हांला संवय—पण तुम्हां सुशिक्षितांचं हें असं आहे–पदव्या मिळवून आलेला माणूस असला कीं तुम्ही दिपून जातां. किकी मोठी हुशार आहे, मोठी चाणाक्ष आहे, असा माझा समज होता. या बगळ्याला पाहून ती कशी इतकी हुरळून गेलीय कोण जाणे !—"

" तुम्हीं फार कठोर बोलताहांत, धोंडशेट. " मी म्हटलं, " तसं पाहिलं तर मलासुद्धां कांहीं व्यंग दिसत नाहीं त्यांच्यांत. "

" कसं वाटलं व्याख्यान त्याचं तुम्हाला ?" पांडुअण्णा म्हणाले.

" माझ्या दृष्टीनं चागलं झालं, " मी म्हटलं, " पण खेड्यांतल्या लोकापुढं कसं बोलावं याची त्यांना कल्पना नसावी. सारा जन्म मुंबईला आणि विलायतेंत गेलेला—"

" जाऊं द्या हो!" धोंडशेट म्हणाले, "तुम्ही देखिल मुंबईकरच ना? तुमचं पहिलं व्याख्यान मला चांगलं आठवतं. तें कांहीं असं नव्हतं. काय लेकाचा बोलत होता तें त्याचं त्यालाच कळत होतं कीं काय देव जाणे!"

" माझी गोष्ट निराळी होती." मी म्हटलं, " मी कांहीं त्यांच्याइतका विद्वान नाहीं. शिवाय मी इथं आलों तो इथं रहाण्याच्याच उद्देशानं, तेव्हां बोलतांना मी जपून बोलत होतों. अन् मला कळत होतं तरी काय? ज्या कांहीं चार मामुली गोष्टी माहित होत्या तेवढ्याच सजवून मी बोलत असें. यांचं तसं नाहीं. यांनीं पुष्कळ पाहिलं आहे, पुष्कळ ऐकलं आहे, मोठमोठ्यांचा सहवास घडला आहे, मोठमोठ्या ग्रंथाचं अध्ययनही केलं आहे, अर्थात त्यांची भाषा वरच्या दर्जाची असायची हें साहजिकच आहे."

" तुम्हीं त्यांची तरफदारी करणारच." धोंडशेट म्हणाले, " तो तुमचा कॉंग्रेसवाला आहे ना? पण मला ही पोरटी एकदां भेटली असती तर बरं झालं असतं. तिला एकदां सावध करावं असं मला वाटतंय. तें माझं कर्तव्य एकदां मी पार पाडून घेतलं असतं. फारच हुरळलेली दिसते, नाहीं पांडुआण्णा?"

" काय सांगतां येत नाहीं या पोरींचं." पांडुअण्णा म्हणाले, " परवां गुरूजींच्याभोंवती पिंगा घालीत होती, त्यानंतर हुरळलेल्या मेंढीसारखी विनायकश्रीकांतांबरोबर फिरत होती, अन् आतां हा बॅरिस्टर आला—"

" पोरींचं म्हणूं नका!—" बाजूला ऐकत उभी राहिलेली जनी पुढं येऊन म्हणाली, " बामणांच्या पोरींचं म्हणा हवं तर! मोठा अभिमान असतो त्यांना—पोरीनां काय नि पोरांना काय—दोघंही सारखींच!" असं म्हणून ती आंत निघून गेली.

" मोठी विलक्षण आहे ही कुळवाड्याची पोर!" धोंडशेट म्हणाले, " जरा नजर ठेवली पाहिजे हिच्यावर बरं का गुरूजी. तुमच्या कॉंग्रेसच्या तत्वांना केव्हां फट्कन हरताळ फांशील ही पोर, त्याचा नेम नाहीं."

जनीनं मधेंच तोंड घातल्यामुळं विषयांतर झालं आणि धोंडशेट कुळवाड्यांच्या जातीच्या नेकीबद्दल एकेक आख्यायिका सांगूं लागले. मला त्या हकिकती तितक्याशा माहित नव्हत्या. खादीच्या चळवळींत, विशेषतः सूत काढण्याच्या कामीं, कुळवाड्यांनीं जितका भाग घेतला होता तितका दुसऱ्या कोणत्याच जातीचा या कामीं तेवढ्या प्रमाणांत पुढाकार नव्हता. अत्यंत दरिद्री असलेली ही जात जितकी कामसू आहे तितकीच प्रामाणिक आहे, तितकीच भाविक आहे

याचा पुष्कळसा अनुभव निमगांवात आल्यापासून मला आला होता; म्हणूनच धोंडशेटच्या तोंडच्या त्या आख्यायिका ऐकून आपल्या ज्ञानांत आणखी भर पडली असं मला वाटलं.

मंडळी निघून गेल्यावर मी विचार करीत ओटीवर उगीच बसलों होतों. आंत जनीची एकच गडबड चालली होती. घरांत अस्पृश्यांचीं मुलं आल्यामुळं झाडसारव करणं अवश्य झालं होतं. जनीची आजी सुभद्रा आमच्या या उठाठेवींनां विरोध करीत नसे. म्हणूनच तिचं मन दुखवूं नये म्हणून आम्ही अशा वेळीं तिच्या समाधानासाठीं ही सारवासारव करीत होतों.

आंतलं काम उरकतांच जनी बाहेर येऊन म्हणाली, "कसे आंधळे लोक आहेत पाहिलंत ?"

" कुठलं आंधळे लोक ? " मीं विचारलं.

" हे तुमच्या निमगांवचे. किकीचं धोरण काय आहे तें एकालाही कळलं नाहीं. तुम्हाला तरी पुरतं कळलंय कीं काय कोण जाणे. "

" तरी पण त्यांच्या म्हणण्यांत अगदींच तथ्य नाहीं असं नाहीं. किकीला हुरळून जायची संवय आहे—"

" हो, हो, आहे–हुरळून जाण्याइतका उल्हास नसला तर माणसाच्या हातून कांहीं कामच व्हायचं नाहीं. जरा सावधपणा पाहिजे. किकी हुरळली असेल—पण वेळींच नाहीं का सावध झाली ? आतां देखिल तिनं ही चूक केली—बाबीकाकांचा निरोप येतांच चट्कन् होय म्हणून गेली–पण आतां खबरदारी घेतेच आहे कीं नाहीं ? आज तिनं बाबीकाकांना पेंचात धरलं. '

" त्यांत काय झालं ? शेवटीं ते पाणीसुद्धां प्याले नाहींत ! पूर्वीपासूनच त्यांचा विरोध होता. त्यांत कांहीं बदल तर झाला नाहीं ? "

" काय झालं तें एव्हां तुम्हांला कळायचं नाहीं. महारांच्या हातचं खाणाऱ्या माणसाला मुलगी द्यायला ते तयार झाले आहेत हें चौघांसमोर शाबीत झालं, हें काय थोडं झालं ? मग आजवर त्यांनीं आम्हां लोकांना विरोध केला तो कशापायीं ? कुठं गेला आतां तो विरोध ? उद्यां हेंच बोलायला मिळेल की ! "

मी क्षणभर स्तब्ध बसलों असं पाहून जनी म्हणाली, " तिकडे किकीची परीक्षा झाली ती कळली का ?"

" कसली परीक्षा ? "

" अगदीं जुन्या काळच्यासारखी तिची परीक्षा घेतली त्यानं. अन् तिनं पण अगदीं साळसूदपणाचा आव आणून उत्तरं दिलीं. "

" असं का ?" म्हणून मी पुन्हां स्वस्थ बसलों.

" कशाला सांगा तुम्हांला ! " जनी चिडून म्हणाली, " कशाचंच कांहीं चोज वाटत नाहीं तुम्हांला !" असं म्हणून रागारागानं ती आंत निघून गेली.

त्या बाबतींत किकीनं कांहींतरी विशेष केलं असं तिला वाटत होतं. मला तसं वाटलं नाहीं. मी तें कौतुक केलं नाहीं म्हणून तिला राग आला. या असल्या सहानुभूतीची तिला मोठी आवड होती. तिला जसं वाटतं तसंच दुसऱ्याला वाटावं, त्याबद्दल दुसऱ्या कुणी—विशेषतः मीं तिचं कौतुक करावं असा तिचा आग्रह असे. अगदीं बुद्धिपुरस्सर नसलं तरी सहाजिकपणें माझ्याकडून या बाबतींत तिची उपेक्षा होत असे.

अन् मग ती रागावत असे तेंच मला मोठं गोड वाटे. ती चिडून रागावून जावी म्हणूनच, किंबहुना, अशी उपेक्षा दाखवायची बुद्धि मला होई.

किकी जें ढोंग करीत होती तें मला पटत नव्हतं. उघड उघड तिनं आपलं मत स्पष्टपणें बोलून दाखवलेलं मला जास्त आवडलं असतं. हा जो आंधळ्या कोशिंबिरीचा खेळ तिनं चालवला होता त्याचे परिणाम काय होतील याची कल्पना तिला होती कीं काय याबद्दल मी साशंक होतों.

किकी आतां निमगांव सोडून निघून जाणार, अशी गांवच्या बाकीच्या लोकांची खात्री झाली होती. त्या दृष्टीनं ते किकीकडे पहात होते आणि म्हणूनच धोंडशेटनीं तसे उद्गार काढले असं मला वाटलं.

तमाशाचं अवडंबर माजवून या दोघींनीं कोणता बनाव घडवून आणायचा बेत केला होता याची मलाही अटकळ नव्हती; पण या प्रकारांतून कांहींतरी भानगड निर्माण होणार असं मात्र मला वाटल्यावाचून राहिलें नाहीं.

प्रकरण सोळावें

# मी मुत्सद्दी बनूं लागलों

त्या दिवशीं तमाशाला बेसुमार गर्दी जमली होती. तमाशाबरोबरच बाबीकाकांचे भावी जामात, मुंबईचे कॉंग्रेसवाले बॅरिस्टर यांना पहाण्याची जिज्ञासाही या गर्दीला कारणीभूत झाली होती यांत संशय नाहीं. कॉंग्रेसवाला या नात्यानं मी मुंबईहून इथं आलों होतों खरा—पण मी फारसा प्रख्यात माणूस नव्हतों. बॅरिस्टरसाहेब मात्र सर्वांना प्रत्यक्ष परिचियाचे नसले तरी, वर्तमानपत्रांतून वारंवार येणाऱ्या त्यांच्या फोटोमुळं, तसेच कुणितरी मोठं माणूस असल्याचा सर्वांचा समज होता. आणि म्हणूनच त्यांना पहायला सारे उत्सुक झाले होते.

तमाशा सुरू झाला.

तमाशा सुरू झाल्याबरोबर बॅरिस्टरांच्या कपाळाला आठ्या पडल्याचं माझ्या नजरेला आलं. किकीचीही नजर त्यांच्यावर होतीच. ती निर्विकार चेहऱ्यानं सर्व प्रकार लक्षपूर्वक पहात होती. अर्थातच हा तमाशा नित्याप्रमाणेंच चालला होता. त्याच्यांत कोणत्याही प्रकारच्या प्रचाराचा समावेश करण्याइतका अवधि मिळाला नव्हता. पूर्वी कॉंग्रेस कमिटीच्या वतीनं झालेल्या तमाशांत बीभत्सता न दिसण्यासाठीं जेवढा फरक करण्यांत आला होता तेवढाच फरक आजच्या तमाशांत करण्याचं ठरवलं होतं. पण तें तमाशेवाल्यांना कठीण जात होतं.

मधूनमधून ते मूळपदावर येत होते. अश्लीलतेचा उबग झाल्याबरोबर शब्दावर ताबा ठेवणं त्यांचं त्यांनाच कठीण जात होतं-आणि असा एकादा अश्लील शब्द आला, कीं बॅरिस्टरसाहेबांचा सुंदर चेहरा एकदम विरूप होत होता.

तमाशा जसजसा रंगात येत होता तसतसे बॅरिस्टर साहेब जास्तजास्त अस्वस्थ होत होते. मला मनांतल्या मनांत गुदगुदल्या होत होत्या. या उच्चशिक्षित विलायतफेरत व्यक्तीची वाङ्मयीन कल्पना कोणत्या प्रकारची असेल याचा मला अंदाज होता. त्यांना तमाशा आवडणार नाहीं—इतकंच नव्हे, तर तमाशा पाहून त्यांना शिसारी येईल याची मला खात्री होती. जनी आणि किकी यांनीं म्हणूनच तर हा बेत केला नसेल ना, अशी मला शंका आली.

मग किकीचा विचार तरी काय होता? या सद्गृस्थाबरोबरच आपल्या बापालासुद्धां कांही वेळ खेळवावं आणि शेवटीं त्यांना तोंडघशीं पाडावं असा का किकीचा डाव होता?

प्रेक्षक लोक ऐन रंगात आले तसा तमाशेवाल्यांचा जिभेवरचा ताबा सुटला. ते अगदीं झणझणीत मूळपदावर आले. दौलतजादा झडूं लागला. नाचणाऱ्या बायका प्रेक्षकांच्या समुदायांत शिरून चवल्या घेऊन जाऊं लागल्या. प्रेक्षकही जिकडून तिकडून त्यांना हांका मारून बोलावूं लागले. सभ्यतेचा हा उघडउघड विपर्यास होत होता असं आमच्या सन्मान्य पाहुण्यांना वाटलं असावं. त्यांनीं मला हांक मारून जवळ बोलावलं आणि म्हटलं, "हा प्रकार काय आहे? काय चाललं आहे हें? हे असले प्रकार पहायला कां मला बोलावलंत?"

"आपण कॉंग्रेसचे कार्यकर्ते आहांत—" मीं म्हटलं, "त्या दृष्टीनं—"

"कॉंग्रेसच्या कार्याचा काय संबंध आहे या प्रकारांत?" बॅरिस्टर चिडून म्हणाले," कॉंग्रेसचा प्रचार म्हणजे हा दौलतजादा काय?"

मला हंसू आल्यावांचून राहिलं नाहीं. बॅरिस्टरसाहेबांच्या रागाचा पारा वर चढण्याइतका वेळ थांबून मी हंसतच उत्तर दिलं, "हेच खरे कॉंग्रेसचे अनुयायी आहेत. हे कदाचित खादी घालीत नसतील, अस्पृश्यता पाळीत असतील, अनत्याचाराची यांना जाणिवही नसेल, पण कॉंग्रेसचा गोवर्धन पर्वत आज वर उचलून धरला आहे तो याच दौलतजादा करणाऱ्या किरकोळ काटक्यांवर—एकाद्या करंगळीवर हा सबंध पर्वत उचलला गेला असला तरीही या काटक्यांच्या ढिगीवरच तो तगून राहिला आहे हें मी आपल्याला अनुभवानं सांगतों—"

"मी जाणार!" बॅरिस्टरसाहेब एकदम उठून म्हणाले, "याची चर्चा आपण उद्यां करूं."

"बरं तर. आपली मर्जी!" असं म्हणून मी बाकीच्या गर्दींत मिसळलों.

बॅरिस्टरसाहेब उठतांच बाबीकाकाही उठले—कांहीं पांढरपेशी मंडळीही त्यांच्याबरोबरच जायला निघाली. या हजारांच्या समुदायांतलीं हीं पांचसात माणसंच निघून गेल्यामुळं एक क्षणभर जरी सर्वत्र अस्वस्थपणा उत्पन्न झाला तरीही ते निघून जातांच दुसऱ्या क्षणाला सारा प्रेक्षकवर्ग पुन्हां रंगांत येऊन चालत असलेल्या कार्यक्रमाचा आनंद अनुभवूं लागला.

पहाटेचे दोन वाजेपर्यंत 'वगांच्या' फैरीवर फैरी झडत होत्या. आजपर्यंत झालेल्या कोणत्याही तमाशापेक्षां या तमाशाला जास्त रंग भरला होता. तमाशेवाल्यांना मिळकतही चांगलीच झाली.

तमाशा संपवून मी घरीं आलों. पहातों तों जनीबरोबर किकीही तिथं आली होती. मीं आश्चर्यचकित होऊन विचारलं, "हें काय ? बाबीकाका काय म्हणतील ? अन् बॅरिस्टरसाहेबही काय म्हणतील ? त्यांच्याबरोबरच तूं जायचं नव्हे का ! या अवेळीं तुला घरीं पोचवायला इथं दुसरं आहे कोण ?—"

"पण इथं जातंय कोण घरीं !" किकी म्हणाली, "घरीं जाण्यासाठीं का मी इथं आलेंय ! मला जो खेळ खेळायचा होता तो मीं खेळून पाहिला. पुढं काय होणार याची अटकळ मला आहे. त्या प्रसंगाची जय्यत तयारी मी आधींच योजून ठेवली आहे. कांहीं काळजी करूं नका तुम्ही. माझं मी पाहून घेईन !—"

"पण दोष माझ्यावर येईल ना ?" मीं जरा गंभीर होऊन म्हटलं, "पुन्हां मीं फाटाफूट कली बाबीकाकांच्या घरांत, असा आरोप येईल ना माझ्यावर ?"

"त्यांत काय आहे ?" जनी म्हणाली, "आजपर्यंत थोडे का आरोप आले आपल्यावर ? त्यांना नाहीं का आपण तोंड दिलं ? मग आतां भ्यायचं कुणाला ?—अन् कां म्हणून ? तुम्हींच जर असे हातपाय गाळूं लागलां तर आम्हीं पहायचं कुणाच्या तोंडाकडे ?"

मी उगीच राहिलों असं पाहून किकी म्हणाली, "पहिल्यापासूनच तुम्हांला हा अंदाज आला नसेल असं मला वाटलं होतं. मी एक प्रयोग करून पहात होतें. कां कोण जाणे, मला वाटतं, तुम्हीं सारंच खरं धरून चालतां आहांत. असले कॉंग्रेसमन मीं पुष्कळ पाहिले आहेत. त्यांना भाळून जाण्याइतकी मी आंधळी नाहीं. समजलं ? उगीच अंदाज करण्यापेक्षां एकदां चांगली कसोटी लावून अनुभव घ्यावा—प्रत्यक्ष प्रचिती घ्यावी—म्हणून आम्हीं हा घाट घातला. तुम्हांला वाटलं, सारे 'नॉर्मल' व्यवहार चालले आहेत म्हणून ! होय ना ?"

मीं कांहींच उत्तर दिलं नाहीं. माझा गैरसमज झाला होता खरा—निदान मी घोटाळ्यांत

पडलों होतों. मनावर झालेल्या धावत्या परिणामामुळं माझ्या वृत्तींत हा अकारण संशय उत्पन्न झाला होता, याची मला जाणिव होती—म्हणूनच मी ओशाळलों.

मी बोलत नाहीं असं पाहून जनी आणि किकी एकमेकांच्या कानांशीं लागून कुजबुजत होत्या. मला त्यांचं वैषम्य वाटलं. माझ्यावर त्यांचा विश्वास नाहीं, हें पाहून मीही एकप्रकारें घमराट झालों होतों. तसा विश्वास डळमळायला मी पुरेसं कारण दिलं होतं.

पण त्याही दोषी नव्हत्या का? त्यांनीं जो कट केला तो माझ्यापासून कां चोरून ठेवला? कां मला विश्वासांत घेतलं नाहीं? मी काय त्यांना विरोध केला असता? या एवढ्या मुदतींत निष्कारण त्यांनीं माझ्या मनाला कां यातना होऊं दिल्या? कां एवढी माझी कदर केली नाहीं?

माझी मनःस्थिति त्या दोघींच्याही ध्यानीं आली असावी. आपसांतलं कुजबुजणं थांबवून किकी म्हणाली, "राग आला आहे होय तुम्हांला? क्षमा करा हं! खरं पाहिलं तर मी सारं कांहीं तुमच्यासमोर उघड करून बोलून दाखवलं पाहिजे होतं. पण क्षणभर मला शंका आली. तुम्ही एक निष्ठावंत कार्यकर्ते आहांत हें मी जाणतें. मीही तितकीच निष्ठावंत आहें असं मला वाटत होतं—असं मला वाटत होतं असं मीं म्हटलं, म्हणून तुम्हाला आश्चर्य वाटेल. काँग्रेसवरची माझी निष्ठा उडायला असं काय कारण झालं, असाही तुम्ही प्रश्न कराल—"

"छे! छे!" मीं म्हटलं, "मी कसलाच प्रश्न करणार नाहीं. मी सार्वजनिक प्रचाराचा भोक्ता आहें. वैयक्तिक मतांची मी फारशी कदर करीत आलों नाहीं—"

"फार मोठे माणूस आहांत आपण!" किकी मला खिजवण्याच्या उद्देशानं म्हणाली, "व्यक्तीचीं मनं तयार झाल्याशिवाय सार्वजनिक प्रचार तुम्ही करणार कशाच्या जोरावर? घाबरूं नका—माझीं मतं बदललेलीं नाहींत—माझी निष्ठाही ढळलेली नाहीं. एवढं खरं, कीं मला आंधळा आज्ञाधारकपणा आवडत नाहीं. व्यक्तीच्या स्वातंत्र्यावर सामुदायिक स्वातंत्र्याची कल्पना स्थिर होत असते, असं मला वाटतं. त्या समजाच्या आधारावरून मी माझं वैयक्तिक स्वातंत्र्य वापरून घेत होतें. अन् म्हणूनच तुम्हांला कांहीं सांगितलं नाहीं. जनीची निष्ठा कुठंच नाहीं. तिच्या स्वतःच्या आवडीनिवडीपुढं ती कुणाच्या मताची पर्वा करीत नाहीं. अशिक्षित आहे ना ती? आमच्यासारखी ज्ञानी नाहीं. ज्ञानापेक्षां अज्ञानाचं बळ मोठं जबरदस्त असतं. म्हणूनच पलटणींत रिक्रुटभरती करतांना सुशिक्षितांचा समावेश कुणी करीत नाहीं. अजाण माणसं आज्ञाधारक असतात. त्या अजाण माणसांच्या सामुदायिक आज्ञापालनावरच राजकर्त्यांनीं जशा लढाया लढवल्या, तशींच आमची काँग्रेससुद्धां अजाण माणसांच्या अजाणपणावरच अवलंबून राहून आपला हा लढा चालवीत आहे. तुम्हांला नाहीं असं वाटत?"

" मला काय वाटायचं त्यांत ! " मीं म्हटलं, " वर्तमानपत्रांतून येणारे काँग्रेसचे कार्यक्रम जेवढे कळतात तेवढ्यावरच माझं ज्ञान आधारलेलं आहे. मी कांहीं काँग्रेसच्या कुठल्याच अंतर्गत मंडळातून वावरलेला नाहीं. मी आलों तों सरळ या निमगांवात. इथं मला वाटेल त्याप्रमाणं मीं कार्यक्रम सुरू केला. विधायक कार्यक्रम म्हणून काँग्रेसनं जें कांहीं आखलं आहे त्यांतच या माझ्या कार्यक्रमाचा अंतर्भाव होत असल्यामुळं माझं आजवर कौतुक झालं. अजाण शिपायाचा आज्ञाधारकपणा मीं आचरला खरा पण तो नकळत होता. आतां स्वतःची बुद्धी वापरायला मला सुरवात करायची आहे. या तमाशानं माझ्या मनावर मोठी छाप टाकली आहे. तोफा बंदुकांपेक्षां देखिल हें हत्यार मोठं जाज्वल्य आहे असं मला वाटत होतं, तें आजच्या अनुभवानं अगदीं निश्चित झालं. त्याच्याच बरोबर आजच माझ्या मनांत शंका उत्पन्न झाली. ती शंका आज मी बोलून दाखवीत नाहीं. मी अनुभव घेणार आहे आधीं— " असं म्हणून पुष्कळ बोलावं असं वाटत असूनही मी अर्ध्यावरच भाषण थांबवलं.

" आमचे गुरुजी आतां मोठे मुत्सद्दी बनूं लागले आहेत बरं का ? " जनीकडे बघून किकी म्हणाली. तिला डोळा घालून जनी हंसली—किकीही हंसली आणि नंतर म्हणाली " कशाला हा आव आणतां ? तुमच्या मनांत काय आहे तें मी सहज सांगूं शकेन."

" मग सांग ना ? " मी म्हटलं.

" सांगेन, सांगेन ! " किकी म्हणाली, " वेळ आली कीं तेंही सांगेन. मुत्सद्दीपणा कांहीं तेवढा तुम्हालाच कळतो असं समजूं नका—"

तिचं बोलणं तेवढंच राहिलं. बाहेर दारावर कुणि थापा मारीत होता. जनीनं जाऊन दार उघडलं तों कंदील घेऊन एक गडी आंत आला. तो बाबीकाकांकडून आला होता. त्याला पहातांच किकीनं विचारलं, " कायरे सुडक्या, यावेळीं कुठं आलास इकडे ? "

" खोतांनीं पाठवलंय. " तो म्हणाला, " तुम्हांला घेऊन यायला. तमाशाचीं माणसं सारीं परत येईपर्यंत ते वाट बघत बसले होते. कोण सोबत नाहीं म्हणून तुम्ही आलां नाहींत असं वाटलं त्यांना, म्हणून पाठवलंय मला कंदिल घेऊन."

पुन्हां दोघींनीं एकमेकींकडे पाहिलं. जनी किकीच्या कानाला लागली. अजूनही त्या दोघी मला विश्वासांत घेत नव्हत्या.

" बरं, बरं, " किकी गड्याला म्हणाली, " काकांना सांग, मी आतां सकाळींच येईन. "

" छे, नाहीं ! " गडी म्हणाला " आत्तांच घेऊन यायला मला सांगितलंय त्यांनीं, मुंबईचे साहेब वाट बघत बसले आहेत. "

" अस्सं ! " जनी म्हणाली, " साहेब कशाला यावेळीं तिची वाट बघत बसलेयत ? जा, त्यांना सांग, उद्यां सकाळीं येईल. चल ग, आपण आतां झोपूं जाऊन. एवढ्या अपरात्रीं कुठं जाणार आहेस मैलभर रस्ता तुडवीत ?"

गडी बिचारा टकमक पहात राहिला होता. काय करावं तें त्याला सुचत नव्हतं. तो म्हणाला, " खोत माझी खावड काढतील. चला ना ! "

" ती कांहीं आतां यायची नाहीं. " जनी म्हणाली, " वाघ असतो वाटेंत. तुला भीति वाटत असली तर तूंसुद्धां जाऊं नकोस. तुलाही देतें एक तरट आंथरून इथं. "

" छे ! छे ! मी नाहीं बा. " गडी म्हणाला, " मला गेलंच पाहिजे. "

" मग जा तर. " असं म्हणून किकीला घेऊन जनी आंत गेली. गडी नुसता पहात राहिला होता तोंच आतलं दार बंद झालं.

" आतां काय करूं मी ? " गडी म्हणाला, " खोत जीव काढतील माझा. संगाती घेतल्या-वांचून येऊं नकोस असं अगदीं कडकावून सांगितलं होतं त्यांनीं. "

" तूं जा आतां. " मीं म्हटलं, " मोठ्या खट्याळ आहेत या पोरी. एकदां नाहीं म्हटल्या-वर कांहीं ऐकायच्या नाहींत. "

गडी पुढं जाऊन दार ठोठावूं लागला तेव्हां आंतून जनी ओरडली, " मुकाट्यानं जा पाहूं. नाहींतर धक्की मारून बाहेर घालवीन !"

" माझं मरण आलंय झालं ! " असं म्हणून गडी निघून गेला.

मीं दरवाजांतून डोकावून पाहिलं. त्याच्या कंदिलाचा उजेड वांकड्या वळणाआड दिसेनासा होईपर्यंत मी बघत राहिलों होतों. दरवाजा बंद करून मी येऊन बिछान्यावर पडणार तोंच आंतला दरवाजा उघडून किकी आणि जनी बाहेर आल्या.

" आम्ही खट्याळ का ? " किकी माझ्यासमोर फतकल घालून बसून रागाचा आवि-र्भाव आणित म्हणाली, " अन् तें या गड्याला सांगतां ? आम्हीं खट्याळ—अन् तुम्हीं मोठ साळसूद ! नाहीं ? बायकामाणसांची गडीमाणसासमोर अशी अब्रू घ्यायला कांहीं वाटत नाहीं का तुम्हांला ? काय हो खट्याळपणा केला आम्हीं ? "

मी उगीच राहिलों. मी हंसायचा प्रयत्न करीत होतों पण माझं मलाच चमत्कारिक वाटत होतं. ही थट्टा चालली आहे हें मला कळत होतं. तरीही हंसण्यावारी नेऊन विषय टाळायचा प्रयत्न न करतां मीं गंभीरपणें म्हटलं, " खट्याळ नाहीं तर काय ? नुसत्या खट्याळच नव्हे—फसव्या अहांत तुम्ही ! त्यांतून तूं—तूं किकी—तूं जास्त खट्याळ आहेस ! मला फस-

वते आहेस, बापाला फसवते आहेस, तो कोण झब्बु आलाय त्यालाही फसवते आहेस ! अन् कोण जाणे, स्वतःला सुद्धां फसवीत असशील कदाचित ! किती दिवस चालणार ही तुझी फसवाफसवी ? ”

दोघीजणी मोठमोठ्यानं हंसत सुटल्या. त्यांना हंसण्याच्या उकळ्यावर उकळ्या येत होत्या. आपण कांहीं तरी मोठं शतकृत्य केलं, भली या माणसाची खोड मोडली, असंच जणुं कांहीं त्यांना वाटत होतं. खरोखरच मला राग आला अन् मी म्हणालों, “ आतां मुकाट्यानं दोघी जाऊन निजा पाहूं. उगीच त्रास देऊं नका मला. नाहींतर खरोखरच मला मास्तरची ड्यूटी बजावावी लागेल. छडीनं झोडपून काढीन एकेकीला !—” मी जसजसा बोलत होतों तसतशा त्या जास्त जास्त हंसत होत्या. हंसतां हंसतां त्यांच्या मुरकुंड्या वळत होत्या.

“ जातां कीं नाहीं ? ” मीं ओरडून म्हटलं, “ कीं दिवा मालवूं ? ”

हंसणं थांबवून किकी म्हणाली, “ दम कशाला देतां ? मालवा पाहूं दिवा छाती असली तर ? इथं आम्हीं दोघीं आहोंत म्हणावं. एकटी नाहीं कुणी ! ”

“ चल, त्यांचं काय ऐकतेस ? ” जनी म्हणाली, “ त्यांना काय कळतंय ? उद्यांची तयारी करायची आहे म्हणावं ! रणं माजतील उद्यां तेव्हां समजेल !—” असं म्हणून किकीला ओढीत ती आंत घेऊन गेली.

दिवा मालवून मी बिछान्यावर पडलों. माझं मलाच कौतुक वाटलं. माझा राग खराच खरा होता कीं तें रागाचं अवसान होतं—खोटं अवसान होतं—हें माझं मलाच कळेना. माझ्या हृदयाला गुदगुल्या होऊं लागल्या. अनपेक्षित कौटुंबिकतेचा तो निसटता प्रसंग पाहून माझं हृदय अननुभूत अशा अपरिचित भावनांनीं भरून आलं होतं.

त्या आनंदाच्या भरांतच मी झोंपी गेलों.

प्रकरण सतरावें

# आम्हीं सहभोजन केलें

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मला उठायला उशीर झाला. घाईघाईनं नित्यविधि उरकून बाहेर आलों तों बॅरिस्टरसाहेबांची स्वारी आधींच येऊन बसल्याचं दिसून आलं.

स्वारी जरा घुश्शांत असल्याचं दिसत होतं. मीं नमस्कार करतांच उगीच नुसती मान हालवून ते म्हणाले, " आज मी आलों आहें तो मुंबई कॉंग्रेस कमिटीच्या वतीनं !— "

" कोणत्याही नात्यानं आपण आलांत तरी— " मीं म्हटलं, " तरीं आपल्या स्वागतांत माझ्याकडून उणिव येणार नाहीं. "

" मी स्वागत करून घेण्यासाठीं आलों नाहीं. " बॅरिस्टरसाहेब जरबेच्या आवाजांत बोलले, " मी तुम्हाला जाब विचारायला आलों आहें. हें काय चाललं आहे ? "

साहेबांचा खडा आवाज ऐकूं आल्यामुळं जनी आणि किकी येऊन आंतल्या दाराआड उभ्या राहिल्या.

पुन्हां प्रश्न आला, " मिस्टर मराठे, हें काय चाललं आहे ? "

" कुठं ? "

" या इथं—या निमगांवात. इथं काय करताहांत तुम्ही ? "

" कॉंग्रेसचं कार्य ! "

" कुठल्या कॉंग्रेसचं ? "

" मी एकच कॉंग्रेस ओळखतों. इंडियन नॅशनल कॉंग्रेस. तिचीच सेवा मी बजावतों आहें."

" कसली सेवा ? हे तमाशे ? हा अश्लीलपणा ? हा धुडगुस ? हा गोंधळ ? काय चालवलं आहे हें ? कुणि सांगितलं तुम्हाला या उठाठेवी करायला ? "

अधिकाराचा आव आणून ज्या रीतीनं हे प्रश्न करायला त्यांनीं सुरवात केली होती तीमुळं माझं मस्तक भणाणून उठलं, तरीही आत्मसंयमन करून मी म्हणालों, " कोणत्या नात्यानं आपण हे प्रश्न करतांहांत ? "

" कॉंग्रेसचा एक अधिकारी या नात्यानं. "

" आपण कॉंग्रेसचे एक अधिकारी म्हणून इथं आलां आहांत, कीं बाबीकाकांची मुलगी पहायला आलांहांत ?

" शट अप्! " बॅरिस्टरसाहेब ओरडले, " जादा बात करायचं काम नाहीं. मी विचारतों त्या प्रश्नाचीं उत्तरं द्या. "

यावेळीं मला चांगलंच आत्मसंयमन करावं लागलं. मीं शांतपणानें म्हटलं, " मुंबईच्या कॉंग्रेस कमिटीचं एकादं अधिकारपत्र आपल्या हातीं असल्यावांचून मी आपल्या कोणत्याही प्रश्नांचीं उत्तरं देऊं शकत नाहीं. कुणीही माणूस येईल अन् काय वाटेल तें विचारील—त्याला उत्तर द्यायला मी बांधलेला नाहीं. "

" मला तुम्हीं ओळखत नाहीं ? "

" नाहीं. अधिकृतरीत्या मी आपल्याला ओळखत नाहीं. कॉंग्रेसचीं माणसं सभ्य असतात असा माझा समज आहे. आपण तसे दिसत नाहीं. "

" ठीक आहे ! " असं म्हणून बॅरिस्टर साहेब उठले आणि जाऊं लागत असतांना म्हणाले, " याचा जाब तुम्हांला द्यावा लागेल. तुम्हांला वाटत असेल, कीं आपण कांहीं कुणाचा नोकर नाहीं. पण कॉंग्रेस कुणाला प्रत्यक्ष पगार देत नसली तरीही प्रत्येक कॉंग्रेसकार्यकर्ता हा कॉंग्रेसचा नोकर आहे. "

" खरं आहे. " मीं हंसत हंसत म्हटलं. " कॉंग्रेसचा ' नोकर ' आहे—' अधिकारी ' नाहीं. कॉंग्रेसच्या साऱ्या नोकरांचा दर्जा एक आहे. "

" बरं बरं, कळलं !" असं म्हणून बॅरिस्टर साहेब जायला निघाले, तोंच हातांत चहाचा पेला घेऊन किकी पुढं येऊन मोठ्या अदबीनं म्हणाली, " चहा घेऊन जायचा म्हटलं !"

एक क्षणभरच बॅरिस्टरसाहेबांना विचार पडला.

" यायचं इकडे, बसायचं म्हटलं. " किकी म्हणाली.

बॅरिस्टरसाहबांच्या चेहऱ्यावरील संतापाची छटा एका क्षणांत मावळली. ते म्हणाले, " सभ्य-पणें कसं वागावं हें तुम्हीं तरी यांना शिकवा. "

बॅरिस्टरसाहेब बैठकीवर बसले. त्यांच्यापुढं चहाचा पेला ठेवून बाजूला अदबीनं उभी राहून किकी म्हणाली, " मोठा दोष आहे तो त्यांचा. मोठ्यामाणसाशीं कसं वागावं हें यांना मुळींच कळत नाहीं. मीं हजार वेळां समजवायचा प्रयत्न केला—त्यांतून इथं मोठीं माणसं तरी कोण येतात म्हणा? —सरकारी अधिकारी आले तर आम्हीं कांहीं त्यांच्याकडे जात नाहीं. दुसरीं कुणी मोठीं माणसं इकडे फारच क्वचित येतात. त्यामुळं सहज चूक होते आहे माणसाची. एवढा राग करायला नको होता आपण. मला विचारलं असतं तर मीं सांगितलं असतं—"

" पण तुम्ही इथं आलां होतां हें मला काय माहित ? " चहा घेत घेत बॅरिस्टरसाहेब म्हणाले, " पण तुम्हाला तरी कसं विचारायचं ? तुम्हीं यांना मदत करीत असाल—पण ती स्वयंस्फूर्तीची मदत आहे. यांना इथं पाठवलं आहे तें कॉंग्रेस कमिटीनं. इथल्या कामाबद्दल कॉंग्रेस कमिटीला हे जबाबदार आहेत. म्हणून मी—"

" काय विचारायचं होतं ? " किकी मधेंच म्हणाली—त्याच वेळीं दुसरा चहाचा पेला आणून जनीनं माझ्या हातीं दिला. मी तसाच उभ्याउभ्यानं चहा घेत होतों.

" विचारायचं काय ? " बॅरिस्टरसाहेब म्हणाले, " हा जो काल तमाशा केला तो कॉंग्रेस कमेटीच्या वतीनं, असं मला सांगण्यांत आलं होतं. तमाशा करण्यासाठीं का यांना इथं पाठवलंय ? "

" खरंय आपलं म्हणणं ! " किकी म्हणाली, " मलासुद्धां तें आवडलं नाहीं. " असं म्हणून एक क्षणभरच माझ्याकडे पाहून पुन्हां बॅरिस्टरसाहेबांकडे वळून ती म्हणाली, " या खेड्यांतले आचारविचार आपल्या परिचयाचे नाहींत. मलासुद्धां ते अजून माहित नव्हते. त्या जुन्या शिरस्त्यांच्या आधारावर हे सारे प्रकार इथं चालतात. पण मला कांहीं तें आवडत नाहीं. आपलं म्हणणं अगदीं बरोबर आहे. असल्या प्रकारांचा वेळींच निषेध झाला पाहिजे—"

ती बोलत असतांनाच बाबीकाका रागारागानं आंत आले—पण तिथं बॅरिस्टरसाहेब असल्याचं पाहून एकदम थबकले. किकी तशीच हंसत हंसत बॅरिस्टरसाहेबांशीं बोलत होती आणि तेही मोठ्या कौतुकाच्या दृष्टीनं तिच्याकडे पहात होते, याचं बाबीकाकांना आश्चर्य वाटलं.

" या—बसा ! " असं मी म्हटलं तरीही बाबीकाका तसेच उभे राहिले असं पाहून किकी म्हणाली, " या ना काका, मी सारं समजून सांगतें—" बाबीकाका येऊन बॅरिस्टर-साहेबांच्या शेजारीं बसले तेव्हां किकी म्हणाली, " थांबा हं–चहा घेऊन येतें. "

" कांहीं नको चहा मला. " बाबीकाका तावातावानें म्हणाले. तरीही किकी आंत निघून गेली.

" अशी समंजस मुलगी मी कुठंच पाहिली नाहीं ! " बॅरिस्टरसाहेब म्हणाले.

" अहो, मुलगी काय म्हणतां ? " बाबीकाका राग विसरून मोठमोठ्यानं हंसत म्हणाले, " आतां मुलगी म्हणायचं नाहीं. ती मुलगी आहे खरी पण ती माझी—आतां—पण जाऊं द्या ? इथं नकोत त्या गोष्टी. ऐकलंस का कमा, आतां चहा नको मला—" बॅरिस्टरसाहबांकडे वळून ते म्हणाले, " सकाळींच इकडे कुठं आलां होतां ? "

" तें मी सांगतें !—" चहाचा पेला बाबीकाकांसमोर ठेवीत किकी म्हणाली, " तें असं झालं काका, कालचा प्रकार कांहीं मला आवडला नाहीं. हीं असलीं माणसं इथं आलेलीं—यांना का हे तमाशे दाखवायचे ? पण ही वेडं आहेत ना आमच्या गुरुजींचां ? कांहींतरी डोक्यांत घेतात झालं ! म्हणूनच मी काल घरीं आलें नाहीं. म्हटलं वेळींच त्यांची चांगली कानउघाडणी करीन. चांगल्या मनच्या दहा गोष्टी ऐकवल्या त्यांना काल तमाशा संपल्यानंतर. "

" अस्सं होय ? " बाबीकाका एका घोटासरशीं चहाचा पेला खालीं करून म्हणाले, " मग येतेस ना आतां ? चला बॅरिस्टरसाहेब, आतां काय बोलायचं असेल तें तिकडेच बोलूं."

" तुम्हीं व्हा पुढं, " किकी म्हणाली, " मी आलेंच इथली व्यवस्था लावून. आज पाहुण्यांना आमंत्रण आहे जेवायचं. "

" छे, छे, मी मुळींच येणार नाहीं—" बॅरिस्टरसाहेब ताड्‌कन उठून म्हणाले. त्याबरोबर बाबीकाकाही उठून उभे राहिले.

" असं कधीं झालंय ? " किकी म्हणाली, " सकाळींच आमंत्रण द्यायला येणार होतों आम्हीं, तोच यांचीं स्वारी आली. धोंडशेट येणार आहेत, पांडुअण्णा येणार आहेत, आणखिन् बरीच मंडळी येणार आहे. तोच बेत ठरवला आम्हीं पहाटे. आतां रीतसर आमंत्रण द्यायला गुरुजी येतील तिकडे ! इथं सैंपाकाकडे मला पाहिलं पाहिजे. एकटी जनी अन् ती म्हातारी—काय होणार आहे त्यांच्या हातून ? अन् काका, तुम्ही पण यायचं हं पाहुण्यांबरोबर. नाहीं म्हणायचं नाहीं. मला मोठं वाईट वाटेल."

" बरं बरं. " बाबीकाका हंसत म्हणाले, " येईन हं !—पण आतां आम्ही जातों. साहेबां-कडे काम आहे माझं—कायद्याची सल्ला घ्यायची आहे एका बाबतींत. "

ते निघाले असं पाहून काय करावं हें मला सुचेना. किकीनं मला डोळा घातला. तेव्हां अंदाजानं तिचं मनोगत ओळखून मी अदबीनं नमस्कार करीत म्हटलं, " तेव्हां म्हटलं उभयतां पायधूळ झाडायची दुपारीं—अन् पंक्तीचा लाभ द्यायचा आह्मां गरीबांनां. रीतसर आमंत्रण द्यायला मी येतोंच आहें तिकडे थोड्या वेळानं धोंडशेटना घेऊन. "

" कांहीं जरूर नाहीं. " बाबीकाका म्हणाले, " पोंचलं बरं आम्हाला आमंत्रण. मुद्दाम यायला नको कांहीं. "

" मोठी कृपा झाली आपली ! " मी दाराबाहेर पडलेल्या त्या दोघांना पुन्हां एकदां नमस्कार करीत म्हणालों.

ते नजरेच्या टापूपलिकडे जाईपर्यंत मी थांबून राहिलों होतों. मागं वळलों मात्र, त्यासरशीं जनी आणि किकी मोठमोठ्यानं हंसत सुटल्या.

त्यांच्या हंसण्याला मी जोड दिली नाहीं.

" हें काय चालवलं आहेस ? " मी खरोखरच रागारागानं म्हणालों. त्या दोघींचंही हसूं आवरत नव्हतं. उकळ्यावर उकळ्या येत त्या सारख्या हंसत होत्या. " आतां गप्प राहातां कीं नाहीं ? " मी एकदम ओरडून म्हणालों, " हें काय नाटक चाललंय ? अन् मीही मुर्खासारखा लागलोंय तुमच्या नादीं. तुम्ही कांहीं तरी म्हणावं अन् मी त्याला होकार द्यावा ! कुठं आहेत पांडुअण्णा ? कुठं आहेत धोंडशेट ? केव्हां विचारलं आहे त्यांना ? कुणि विचारलंय ?— " माझ्या प्रत्येक प्रश्नाला एका एका हंशाच्या उकळीचं उत्तर येत होतं.

" पण वेळ मारून नेली कीं नाहीं ? " मोठ्या कष्टानं हसूं आवरीत किकी म्हणाली, " कसे गार झाले काका ! किती बेमालुम अभिनय केला मी. "

" अन् आमंत्रण द्यायला मला पाठवणार होतीस ? " मी तावातावानं म्हटलं, " अन् आतां काय करणार आहेस ? पांडुअण्णा अन् धोंडशेट यांना कोण जाणार आहे सांगायला ? "

" तेवढ्यानंच काय झालंय ? " जनी म्हणाली, " चार दोन ढोलवाले नको का बोल-वायला ?—पंक्तीला बसायला !—अन् हे येतील त्यावेळीं ढोल वाजवून त्यांचं स्वागत नको का करायला ?— "

" वा वा ! ही छान कल्पना ! " किकी म्हणाली, " एकुण तुला डोकं आहे जने. काकाही येणार आहेत, तेव्हां होऊन जाऊं दे एकदां हा समारंभ ! " असं म्हणून किकीनं जनीची पाठ